# संगीत सावित्री.




सावित्री०:—भजनानें आळविला । देव दैवसम कधिं न उलटला । ऐसा महिमा गाइला ॥ धृ० ॥ [पृष्ठ ५७

# प्रस्तावना.

सावरमती नदीच्या कांठीं एक वर्षाची कारागृह—वासाची शिक्षा भोगीत असतांना १९२१ सालीं ह्या नाटकांतील गद्यभाग लिहिला असून, 'गंधर्व नाटक मंडळी'च्या मुंबईच्या सांप्रतच्या मुक्कामांत विशेषत: रा. कृष्णराव फुलंब्रीकर व रा. नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व ह्यांनीं चाली दिल्यावर पदें रचण्यांत आलीं आहेत. पुस्तकांतील चित्रांकरितां नाटकांतील निरनिराळ्या प्रसंगांचे फोटो दिल्याबद्दल, पदांच्या चाली दिल्याबद्दल, व नाटक बसवितांना फार मेहनत घेतल्याबद्दल 'गंधर्व नाटक मंडळी'चे मानावे तेवढे आभार कमीच होणार आहेत.

मुंबई, नवाकाळ वाडी.
ता. ६ मार्च १९३३, ग्रंथकर्ता.



॥ श्री ॥

# संगीत सावित्री



## अंक पहिला.



### प्रवेश पहिला.



[ सूत्रधार व पारिपार्श्वक पूजन करीत प्रवेश करितात. ]

**नांदी.**

पद १ राग भूप, ताल धिमा त्रिताल; चाल–" उदतन देरेना."

विठ्ठल नमिला; पंढरपुरांत परम सद्धर्म पुंडलिक–कर्म। न काम न धाम, कटिवरि ठेवुनि कर हरि सज्जन–सुखांत रमला ॥ धृ० ॥ जवळि न कमला, गरूड न सजला। विटेंत झळकत महिमा दिसला ॥ १ ॥

पद २ राग–बिहाग, ताल त्रिवट; चाल–" भज रामचरण."

निज भक्त–जना शील–धारणा। शासितो सदा विठ्ठल राणा ॥ धृ० ॥ जनक सेविला, देवहि आला। कर्मयोग हा पथ निर्वाणा ॥ १ ॥

सूत्र०:—पुंडलीक करीत असलेली आईबापांची सेवा पाहून संतुष्ट झालेल्या भगवानाला, आसन म्हणून पुंडलीकानें पुढें केलेली वीटच वैकुंठाहून अधिक प्रिय कशी झाली, आणि विटेवर उभे राहिलेले वैकुंठनाथ भीमातीरीं लक्ष्मी

जवळ आली असतांहि तिजकडे पहावयास कसे विसरले, हें पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाचे ध्यानानें आतां मनावर चांगलें बिंबलें आहे. पुढील पिढी नजरेखालीं ठेवून विटेवर उभी असलेली ती सांवळी मूर्ति डोळ्यापुढें आली म्हणजे आपल्या उद्योगाची व सांप्रदायाची हेळसांड पुढील पिढीकडून होईल किंवा कसें, ह्या विषयींची भीति मनांत उरतच नाहीं.–जा तुम्हीं, हीं पूजापात्रें आंत नेऊन ठेवा; आतां माझें मन निर्भय झालें आहे; आमचीं मुलेंमाणसें आमचें व्रत पुढें चालवितील, अशी हमीच पुंडलीकाला प्रसन्न होणाऱ्या श्रीविठ्ठलानें सर्वांना दिली आहे.–जा, तुम्हीं; मला आतां काळजी उरली नाहीं; जा, तुम्ही. [ पा. जातात ] श्रीविठ्ठलाला शरण गेल्यावर मुलामाणसांची काळजी कोठून शिल्लक राहणार ? मीं आतां काळजी करण्याचें सोडून दिलें आहे.

[ नटी येते.

**नटी०:**—तुम्हा पुरुषांना कोठली काळजी ? मी आहेना काळजी करायला, मग तुम्ही कशाला काळजी कराल ?–मुलगा केवढा मोठा झाला–त्याचें लग्न झालें पाहिजे–आहेका कांहीं काळजी ?–मुलानें तुमचे पाय चेपावेत आणि श्रीविठ्ठलानें तें पहावें; माझें नाहीं एवढयानें समाधान होत; करायचेंना मुलाचें यंदा लग्न ?

**सूत्र०:**—अग मुलीच्या लग्नाची काळजी; मुलाच्या लग्नाची काळजी कोण करणार ?

**नटी०:**—अहो, आजकाल मुलींच्या लग्नापेक्षां मुलांचींच लग्नें अधिक कठीण झालीं आहेत. नवऱ्यामुली स्वतः नवरे मुलगे पाहूं लागल्या आहेत; नवऱ्या मुलीला नवरा मुलगा पसंत नाहीं म्हणून गेल्यावर्षी किती तरी लग्नें मोडलीं !–आज आमच्या बाबूला पहायला एक दोन मुली येणार आहेत म्हणे; मला अशी काळजी लागली आहे–अंगावर कोणचे दागिने घालूं, कांहीं सुचेनासेंच झालें आहे—

सूत्र०:—बाबूला पाहायला येणार आणि तुझ्या अंगावर दागिने काय म्हणून !

नटी०:—काय म्हणून ?–सासूच्या अंगावरचे दागिने पाहून, सुनेच्या अंगावर दागिने किती पडतील ह्याचा अंदाज चाणाक्ष मुली बांधतात हो !

पद ३ राग तिलंग, ताल त्रिवट; चाल–" निसदिन लालन. "

**मन भुलवी बहु भूषण–शोभा । चमकत मणिमय रत्नप्रभा ।। धृ० ।।**
**नच ललना धरि लग्न–कल्पना । वर जरि समोर निर्धन उभा ।। १ ।।**

नवऱ्या मुलाच्या घरची संपत्ति जर नजरेला पडली नाहीं तर नवऱ्या मुलीचें लक्ष नवऱ्या मुलाकडे कांहीं केल्या लागतच नाहीं.–तेव्हां म्हणतें शेजाऱ्या-पाजाऱ्यांचे चार जिन्नस गोळा करून आज घरदार नटवून सोडूं या–मीं ऐकलें आहे आज आमचे घरीं येणारी नवरी मुलगी श्रीमंताच्या कुळांतली असून दोन घोड्यांच्या रथांत बसून येणार आहे—

सूत्र०:—येऊं द्रेग, मी चार घोड्यांचा रथ उसना आणून त्यांत बसवून बाबूला तिच्यापुढें फिरवीन—

नटी०:—आणि तीच चार घोड्यांच्या रथांत बसून आली तर—

सूत्र०:—मी रुप्याचा रथ उसना आणीन—

नटी०:—आणि सोन्याच्या रथांत बसून नवरी मुलगी आली तर–म्हटलें सोन्याच्या रथांत–सोन्याच्या रथांत–बाबूला तिच्यापुढें पायींच चालविणार–हो पायींच चालविणार–असें काय पाहतां–बाबूला पायींच चालविणार–अंगा-खांद्यावर कांहीं नाहीं; भिकाऱ्यासारखा उघडा बोडका माझा मुलगा पायीं चालणार–होयना–सांगा, सोन्याच्या रथांत बसून–[ पडद्यांत–" आली सोन्याच्या रथांत बसून–आज तीन दिवस झाले, रोज ह्याच वेळीं नेमकी सोन्याच्या रथांत बसून ही कोण येत असते बरें ? " ] कोण आली सोन्याच्या रथांत बसून?

**सूत्र०**:—सोन्याच्या रथांत बसून येत आहे!—कोण बरें ही?—हं बरोबर आहे—अश्वपति राजाची मुलगी सावित्री नवऱ्या मुलाचा शोध करीत सोन्याच्या रथांत बसून इकडेच येत आहे.

पद ४ राग हमीर, ताल दादरा; चाल—" शंकर गिरिजापती."

**शोधित सुवरा सती। येथ येत सावित्री। श्रेष्ठ वधू ही जगतीं॥ धृ०॥ साधुचरण आचरा। धडा शिकवि पामरा। सकल रीति गुरुहातीं॥ १॥**

[ सूत्रधार व नटी जातात.

[ **स्थळ**—मेध्यारण्य, सत्यवान आणि चित्राश्व वडाच्या झाडाजवळ उभे असलेले प्रवेश करितात. ]

**सत्य०**:—आली सोन्याच्या रथांत बसून!—आज तीन दिवस झाले, रोज ह्याच वेळीं नेमकी सोन्याच्या रथांत बसून ही कोण येत असते बरें?—काल तुला चौकशी कर म्हणून सांगितलें होतें; केलीस का चौकशी?—कोण ही?—सोन्याचा रथ व गजांत लक्ष्मी बरोबर घेऊन येथें राहावयास ही कोण आली आहे?

**चित्रा०**:—ही अविवाहित आहे—

**सत्य०**—मीं नांव गांव विचारलें—लग्न—

**चित्रा०**:—लग्न झालेलें नाहीं—

**सत्य०**:—नसेल झालें लग्न—मला त्या गोष्टीशीं काय करायचें आहे—लग्नाचें वय आहे—होईल लग्न—तरुणींच्या लग्नाच्या गोष्टी अश्विनी कुमारांच्या ह्या मेध्याअरण्यांतील विद्यापीठांत आणि गौतम मुनींच्या ह्या तपोभूमींत आम्हीं बोलणें चांगलें नाहीं—पण कायरे लग्नाचें वय असून लग्न कां झालें नाहीं, शोध घेतलास का?

**चित्रा०**:—मीं नांव गांव विचारलें, लग्न झालेलें नाहीं म्हणून उत्तर मिळालें; मीं कां झालें नाहीं म्हणून विचारलें—

**सत्य०**:—मग काय म्हणाली, सांगना लवकर?—काय म्हणाली?

चित्रा०:—तुमच्या मित्राचें लग्न झालें आहे काय, म्हणून तिच्या मैत्रिणीनें मला विचारलें; मीं नाहीं म्हटल्यावरोबर पत्रिका तर जुळली असें म्हणून मैत्रिणीनें तिला रथांत बसविलें आणि मी तुझ्याकडे धांवत आलों.—पत्रिका जुळते, ही बातमी तुला कळविण्याच्या धांदलींत नांव गांव विचारण्याचें विसरलों.—ती पहा, रथांत बसून ह्या वटवृक्षाकडेच येत चालली—तुझ्याच दर्शनाला येत आहे—तिचेंहि लग्न झालेलें नाहीं व तुझेंहि लग्न झालेलें नाहीं—हा योग ठीक आहे—कां माझ्याशीं बोलण्याची शुद्धहि नाहीं?—इतकें न्याहाळून काय पाहतोस? [सोन्याच्या रथांत बसून सावित्री व गायत्री येतात.

सत्य०:—(स्वगत)

पद ५ राग पूर्या, ताल त्रिवट; चाल—"शाम सुंदरवा."

शांत चाळवीला, दान्त उसळला, ही नवल कला ॥ धृ० ॥
वसंत-वेळा मोहचि फुलला। नूतन बंध-निवास पातला ॥१॥

[सावित्री व गायत्री रथांतून उतरतात.]

तपोभूमीला न साजेसे विकार माझ्याप्रमाणें हिच्याहि मनांत उत्पन्न झाले आहेत काय?—ही अशी गोंधळून गेल्यासारखी कां दिसते?—ही गोंधळून गेली आहे कीं मी गोंधळून गेलों आहें? (उघड) चित्राश्व, आपल्या तपोभूमींत ह्या पाहुण्या आल्या आहेत; पाहुण्यांचा आदरसत्कार करण्यांत चूक होतां कामा नये.

चित्रा०:—वटवृक्षाच्या छायेखालीं थोडा वेळ ह्या शिलातलावर बसून विश्रांति घ्यावी; सोन्याच्या रथांतून उतरून दगडाच्या आसनावर बसण्यास विनंति करीत आहें, तपस्व्यांना सोनें आणि दगड दोनहि सारखींच असतात; आणि वटवृक्षाचें वैभव राजवैभवाहून अधिक मानल्याशिवाय अरण्यांत कोणाचेंच चालत नाहीं.

सत्य०:—माझा मित्र हा चित्राश्व खरें बोलतो पण गोड बोलत नाहीं—

चित्रा०:—आणि हा माझा मित्र सत्यवान गोड गोड बोलतो-आपणच करा आदरातिथ्य-सत्याची ही मूर्तिच आहे, शिवाय अमृताचाहि झरा आहे-

सावि०:—सज्जनांच्या दर्शनापासूनच गोड सत्याचे धडे शिकावयास मिळतात. दर्शन देणें झाल्यावर निराळ्या आदरसत्काराची जरुरी नाहीं. आपण ह्या शिलातलाला सुशोभित करीत असतांना जवळ उभे रहाण्याची परवानगी मिळाली म्हणजे सर्व कांहीं मीं मिळविलें.

पद ६ राग यमन, ताल त्रिवट; चाल—" घुमत फिरत. "

**वास जवळि देवा सज्जना, दुर्मिळ ती अति शुद्ध वासना ।**
**सुरासि तळमळ याचि दर्शना ॥ धृ० ॥ काळोख कुफल देत**
**लोचना, एक किरण गगनासि ने जना । सत्यचि दावी**
**सौख्यसाधना ॥ १ ॥**

तीन दिवस एकसारखें ह्याच ठिकाणीं ह्याच वेळेला मला दर्शन द्यावयाचें झाल्यामुळें—

गाय०:—आम्ही थोडी हकीकत विचारतों, राग नसावा अशी विनंति आहे.

सावि०:—ह्या शिलातलाला जरा सुशोभित करायचें होतें, म्हणजे माझ्या मैत्रिणीला बोलायला धीर येईल.

सत्य०:—( बसून ) आपण ह्या शिलातलावर बसावें; खुशाल विचारा काय विचारावयाचें असेल तें.

चित्रा०:—विचारपूस मागाहून-अगोदर नांवें घ्या-मी आपला सरळ विचारतों-बसा-बसा-अशा बसा-आम्ही आपलीं नांवें सांगितलींच आहेत-हां हां अशा बसा-ह्याच्या समोर बसा-हा माझा मित्र सत्यवान साल्व देशचे राजे द्युमत्सेन ह्यांचा पुत्र असून मी ऋषिकुमार आहें; व सत्यवानाचा मित्र म्हणून सत्यवानाच्या लहानपणाच्या लाडक्या चित्राश्व ह्या नांवानेंच गौतम ऋषींच्या तपोभूमींत मला सर्व तपस्वी ओळखत असतात.-मी राजपुत्र नाहीं, पण हा माझा मित्र सत्यवान राजपुत्र असून साल्वदेशाचा राजाहि होईल, असा गौतम मुनींचा आशीर्वाद आहे.

**गाय०:**—ऐकलेंसना सावित्री, हे साल्वदेशचे युवराज आहेत. ही सावित्री मद्रदेशच्या अश्वपति राजाची कन्या असून आईबापांच्या आज्ञेनें स्वतः वर पाहण्याकरितां चोहोंकडे फिरत आहे. सुमति व बहुबुद्धि असे दोन मंत्री राजकन्येच्या दिमतीला असून मद्रदेशच्या ऐश्वर्यास साजेसा लवाजमा बरोबर आहे.

**चित्रा०:**—स्वयंवरास उद्युक्त झालेल्या राजकन्येनें ह्या मेध्यारण्यांत येण्याचें प्रयोजन काय ? रस्ता चुकून तर येथें नाहींना आलां ?

**गाय०:**—कोणत्याहि राजधानींत तीन दिवसहि पुरते आम्ही काढले नाहींत; दुसऱ्या किंवा फार झालें तर तिसऱ्या दिवशीं सावित्रीला वाटे कीं रस्ता चुकून भलत्याच राजधानींत आलों आणि लगेच मुक्काम हलवला जाई ! येथें मात्र अजून तसें कांहीं कोणालाच वाटत नाहीं.—कां सावित्री, नाहींना वाटत भलत्याच ठिकाणीं आलों असें ?—कां, बोलत कां नाहींस ?

**चित्रा०:**—दुःखीकष्टी प्राण्यांना किंवा तपस्व्यांना हें ठिकाण पसंत पडणारें आहे; पण राजकन्येला—कायरे सत्यवान, राजधानींत ह्या वटवृक्षाहून अधिक मोठे वृक्ष असतात काय ?—अश्वत्थाचा, औदुंबराचा, किंवा वडाचा आश्रय करून खांदीवर बालरूपानें नारायण महाप्रलयाचे वेळीं पडून राहतात, असें मार्कंडेय ऋषींनीं पाहिलें आहे; आणि ह्याच वटवृक्षाचा आश्रय मोठ्या संकटाचे वेळीं केल्याशिवाय परमेश्वराला गत्यंतर नाहीं, अशी माझी खात्री आहे.—पहा नीट ह्याच्याकडे आणि सांगा एवढा विश्वव्यापक वृक्ष ह्यापूर्वी कधीं पाहिलात काय ?—पण राजधानींतल्या लोकांना हें भलतेंच ठिकाण; नाहीं सत्यवान ?

**सत्य०:**—आणखी किती दिवस येथें मुक्काम आहे ? [ बेत्रधारी येतो.

**वेत्र०:**—( सावित्रीला प्रणाम करून )—मंत्री सुमति ह्यांची विनंति आहे कीं, सरकारनीं आज्ञा केल्याप्रमाणें गौतम मुनींच्या कानावर घालून सैन्याच्या तळाची व सरकारच्या शिबिराची व्यवस्था केली आहे.—जंगलांत नवी राज-

धानीच उत्पन्न झाली आहे, सरकार.–मुक्काम दोन आठवड्याचा होणार का चार आठवड्याचा होणार, महाराजांना पत्र कसें लिहावयाचें, म्हणून सुमति मंत्र्यानीं विनंति करायला सांगितल्यावरून—

**सावि०:**—मी आतां इतक्यांत शिबिराकडे येतें–महिन्याचा का वर्षाचा मुक्काम–मी आल्यावर सांगतें—

**वेत्र०:**—आज्ञा सरकार. [ जातो.

**सावि०:**—मुक्काम किती दिवसांचा का किती महिन्यांचा, मला कांहींच सांगतां येत नाहीं.–गौतम मुनींच्या दर्शनाला जर उद्ईक मला नेण्यांत येईल तर मोठे उपकार होतील.

**चित्रा०:**—उद्ईक ह्याच वेळेला ह्याच ठिकाणीं आम्ही येऊं—

**सत्य०:**—आणि गौतम मुनींच्या दर्शनाला बरोबर घेऊन जाऊं–चित्राश्व, चल आतां आपण जाऊं, बाबांच्या होमहवनाची तयारी केली पाहिजे–येऊं आम्ही ?

**सावि०:**—उद्यां ह्याच वेळेला ह्याच ठिकाणीं मी येईन–

**चित्रा०:**—सोन्याच्या रथांत बसून आपण सर्वजण मग गौतम मुनींच्या दर्शनाला जाऊं.

**सावि०:**—गायत्री, वटवृक्षाला तीन प्रदक्षणा घालून शिबिराकडे जाऊं.

[ सावित्री व गायत्री प्रदक्षणा घालतात.

**सत्य०:**—( स्वगत ) मुक्काम महिन्याचा का वर्षाचा–बाबांना आलेल्या आंधळेपणाला गुण येण्याला अद्याप एक वर्ष निदान निघून गेलें पाहिजे, असें कालच गौतम मुनींनीं मला सांगितलें–माझा मुक्काम एक वर्ष तर मेध्यारण्यांत आहेच, पण हिनें काय म्हणून येथें राहायचें ? ( उघड ) चित्राश्व, हो पुढें, मी तुझ्या मागोमाग आलोंच—

**चित्रा०:**—मी प्रदक्षणा मोजतों आहें, तिसरी झाली कीं निघालों–मग तूं येशील आपोआप माझ्या मागून– [ जाऊं लागतो.

**सत्य०:**—प्रदक्षणा वटवृक्षाला, पण दृष्टि एकसारखी माझ्याकडे! पण मी काय म्हणून येथें उभा रहावें?—माझे पाय आश्रमाकडे वळलेले पण माझे डोळे वटवृक्षाकडे!—हा वटवृक्ष म्हणजे परमेश्वरापासून उगम पावलेल्या उर्ध्वमूल विश्वस्वरूपी संसाराची मूर्ति आहे, असें म्हणतात—संसार येथें मला दिसत आहे काय?—दिसत आहे का संसाराकडे मी खेंचला जात आहें?—उशीर कां झाला म्हणून बाबांनीं मला विचारलें तर मी काय सांगूं? आईच्या सेवेंत अंतर पडलें तर हा नवा संसार मला कसा तारील?—पण ही कां प्रत्येक वळणाचे वेळेला मजकडे पाहून माझे प्राण माझ्या डोळ्यांतून बाहेर ओढून नेत आहे?—नको, नको, सावित्री, संकटांत दिवस काढीत असलेल्या माझ्या आईबापांवर दया कर आणि प्रेमपाशांत मला बांधून त्यांच्यापासून मला दूर दूर नेऊं नकोस.—अजून संपल्या नाहींत ह्यांच्या प्रदक्षणा—प्रत्येक प्रदक्षणेला माझ्या भोंवतीं एक एक बंधनाचा वळसा पडत आहे व माझ्या शीलाचा कोंडमारा होत आहे असें मला वाटतें.

पद ७ राग—कामोद, ताल त्रिवट; चाल—“ मन मारिरे. ”

**तप वाहिलें जनका । धर्मासि ऐशा विरोध नसतां, ठाव नच पातका ॥ ध्रृ० ॥ मातापितरा सेवा घडतां, हें तप तपतां, तारिल ही नौका ॥ १ ॥**

[ चित्राश्व व सत्यवान जातात.

**सावि०:**—हीच हीच ती मूर्ति, माझ्या मनांत ठसलेली ती हीच मूर्ति, नारद मुनींनीं बाबांच्या सांगण्यावरून भागवत धर्माचा उपदेश करितांना भगवानांच्या ज्या मूर्तीचें ध्यान मला शिकविलें, तीच ही मूर्ति; परमेश्वर मूर्तिमंत मजपुढें अवतरला आहेसें वाटतें!—बायकांना पतीवांचून दुसरा देव नाहीं म्हणून म्हणतात; त्याची सत्यता ह्यावेळीं पूर्णपणें त्या मूर्तीनें मला पटविली आहे.—सर्व ऐश्वर्यानें सुशोभित दिसणारा भगवान ह्यांच्याहून अधिक शांत, अधिक उदात्त आणि अधिक सुंदर असणें शक्य नाहीं.—हातांतील

धनुष्यबाणाकडे पहा, खांद्यावर पडलेल्या परशूकडे पहा, किंवा एका नजरे-सरशीं जगांतील सर्व क्रूपणाचा पाडाव करणाऱ्या डोळ्यांतील तेजाकडे पहा—शांत रसानें कह्यांत ठेवलेली असली वीरवृत्ति दुसरीकडे कोठेंहि पाहावयास मिळणार नाहीं.—नारद मुनींनीं मला शिकविलेलें परमात्म्याचें भजन—पूजन फळास आलें म्हणून मला ही मूर्ति पहावयास मिळाली—(पदरा आडून तसबीर काढून तसबिरीकडे व सत्यवानाकडे पहात) परमेश्वराचें जें चित्र मी मनानें रेखाटलें होतें तेंच हें बोलतें चालतें चित्र—ह्यांचेंच चित्र माझ्या मनाकडून कसें राजधानींत असतानांच तंतोतंत कागदावर काढलें गेलें—सर्व अवयव कसे हुबेहुब जुळतात—ह्या तसबिरीशीं चेहरा जुळला नाहीं, असें पाहिलें म्हणजे मी त्या राजधानींत क्षणभरहि अधिक राहत नसें; पण येथें—येथें—सर्व—सर्व—तंतोतंत जुळतें—माझा देवच हा, हा पहा, हा पहा—माझा देवच हा !

पद ८ राग बिहाग, ताल त्रिताल. चाल—“ अटलसबजानी. ”

**असाचि दिसला ध्यानीं चिंतना, मिरवित सोज्ज्वल भाव-भावना ॥ ध्रृ० ॥ सतत आपुलें द्यावें नयना। प्रत्यक्ष दर्शन, हीच प्रार्थना ॥ १ ॥**

[ पडदा.

---

## प्रवेश दुसरा.



[ स्थळ—बहुबुद्धि मंत्र्याचें शिबिर. महामति व बहुबुद्धि प्रवेश करितात. ]

**बहु०:**—अरे महामती, ए पोरा काय करतो आहेस ? हें आहे तरी काय ? मला विचारल्याशिवाय कांहीं करूं नकोस, पाऊल टाकूं नकोस, किती ताकीद दिली, तरी तुझें कुत्र्याचें शेपूट वाकडें तें वाकडें ! तूं स्वतःच्या अक्कलेनें चालूं नकोस—तुझ्या ह्या म्हाताऱ्या बापाला पुष्कळ बुद्धया आहेत—बहुबुद्धि माझें नांव आहे—माझ्या बुद्धीनें चाल म्हणजे तुझें दैव—

**महा०**:—इतक्या दिवस आपल्या बुद्धीनें चाललों–दैव हें असें उदयाला आलें–पहा बाबा डोक्यावर दैव कसें उगवलें आहे तें! ही जटा पहा–मी जंगली कसा चट्‌दिशी होईन, सांगते आहे का बाबा आपली एखादी बुद्धि मी जंगली कसा होईन तें? माझ्या बुद्धीप्रमाणें वाग–साठी आणि बुद्धि नाठी–बाबा, सर्व लोक तुम्हाला थेरडा म्हणतात–मी नाहीं म्हणत थेरड्या–लोक करितात टवाळी, द्या बाबा टाळी. पण मी आजपासून माझ्या बुद्धीप्रमाणें वागणार–थेरड्याच्या बुद्धीला सावित्री वरील, असें मला वाटत नाहीं बाबा; माझी तरुणाचीच महामति सावित्रीला पाहिजे आणि मी जंगली झालों पाहिजे–एरव्ही बायकोहि नाहीं आणि जांवई म्हणून अश्वपतीचें राज्यहि नाहीं–बाबा, मी माझ्या बुद्धीनें बायको मिळविणार आणि राज्य मिळविणार–मग असला थेरडा मंत्री मी नोकरीला ठेवणार नाहीं, समजलास म्हाताऱ्या–नव्हे ही शिवीगाळी, द्या बाबा टाळी. बाबा तुम्ही सत्यवानाच्या पित्यासारखे आंधळे व्हा, मग माझें बस्तान ठीक बसेल.

पद ९ राग–मांडजिल्हा, ताल केरवा; चाल–“ पायल बाजे. ”

**अंध पिताजी, मम मन राजी। वृद्धास उपवास, नित्य राहावें ती पिउनिया थंडचि गारचि कांजी ॥ धृ० ॥ बाप नसावा खास डोळसा, नयनें असावा कोळसा। भाग्या तरुणा या चढवीतां, मी मग मिरविन गाजीबाजी ॥ १ ॥**

बाबा, मंत्र्यासारखे मजपुढें अदबीनें उभे रहा, आणि मला लवून मुजरा करा—

**बहु०**:—काय करावें या पोराला–ह्याच्या नशिबीं कोठलें राज्य–वेड्या–पोरट्या–वेड्या–

**महा०**:—तें कांहीं नाहीं बाबा, तुम्ही मला लवून मुजरा केलाच पाहिजे–मी अश्वपतीचा जांवई आहें–सावित्रीचा नवरा आहें–

**बहु०**:—मोठ्यानें बरळूं नकोस पोरा–वेड्या, ऐक माझें–

**महा०** —बाबा, म्हाताऱ्या, थेरड्या—मोठ्यानें बरळणार—हं—थेरड्या—असें बोलणार—लवून मुजरा कर ह्या मद्रदेशच्या राजाला; राजा मी सर्वां छळी, द्या बाबा टाळी.—हें मेध्यारण्य साल्व देशांत नाहीं—मद्रदेशांत आहे—आणि बाबा मी आतां जंगली बनल्यावर ह्या मेध्यारण्याचा खराखुरा राजा होणार—

**बहु०**:—अरण्याचा राजा होऊन काय करणार ? ह्या बहुबुद्धि प्रख्यात मंत्र्याचा तूं मुलगा—नांव तुझें महामति—नांव ठेवायच्या वेळची तुझी अक्कल गेली कोठें ?—जंगली होणार म्हणे जंगली—काय करणार जंगली होऊन ?—झाडा झुडपाचा राजा होऊन काय करणार ?—महामती, तुझी अक्कल कोठें गेली ? ह्या जटेनें काय होणार ?—आहे बुद्धि जाग्यावर ?

**महा०**:—बाबा, तुम्ही बहुबुद्धि, पण एकहि बुद्धि म्हातारपणीं शिल्लक राहिलेली नाहीं—बाबा, सावित्रीचें लक्ष जंगलांतील तपस्व्याकडे लागलें आहे—मी जंगली प्रथम होतों आणि सावित्री जवळ आली म्हणजे तपस्वी होतों; म्हणजे झालीच सावित्री माझी—सावित्री होईल खुळी, द्या बाबा टाळी—आहे का नाहीं माझी अक्कल बडी ?—बाबा,—सुमति आणि गायत्री इकडेच येत आहेत, त्यांनाच विचारा म्हणजे हा जंगली महामति सावित्रीचा पति कसा होणार तें तुम्हाला समजून येईल. [ सुमति व गायत्री येतात.

**सुम०**:—मित्रा बहुबुद्धि, राजकन्येच्या विचारापुढें मी तर हात टेकले आहेत—मला कांहीं सुचत नाहीं.—ह्या सुमति मंत्र्याला परमेश्वरानें बुद्धि दिली आहे किंवा नाहीं, अशी शंका अश्वपति महाराजांना आल्यावांचून राहणार नाहीं.—राजकन्या सावित्रीचा विचार ह्या मेध्यारण्यांत वर्षभर राहण्याचा दिसतो—महाराजांना तातडतोब मेध्यारण्यांतच यावयाला आज सावित्रीनें विनंति केली आहे—सावित्रीपुढें माझी अक्कल चालत नाहीं.—बहुबुद्धि, आपली कांहीं बुद्धि चालली तर पहा—

**महा०**:—बाबांची बुद्धि चालणार का माझी चालणार ?—काय गायत्री, माझीच बुद्धि सावित्रीपुढें चालणार ना ?—होय, होय, माझीच,—माझी जादू महाबळी, द्या बाबा टाळी—

गाय०:—बहुबुद्धींनीं प्रख्यात मंत्री म्हणून इतक्या दिवस लौकिक मिळविला; तुम्ही मात्र सावित्रीकडे भलत्या नजरेनें पाहून—

महा :—हें समजलें काय सावित्रीला?–मी भलत्या नजरेनें नसतों पाहात–खऱ्या नजरेनें–पवित्र नजरेनें–तपस्व्याच्या नजरेनें पाहतों मी सावित्री-कडे–गायत्री, तूं नीट सावित्रीला समजावून सांग हा महामति भलत्या नजरेनें पाहत नाहीं–बाबांची जी नजर तीच माझी नजर–बापाच्या बुद्धींत आणि मुलाच्या बुद्धींत फरक नाहीं–होयना–सावित्रीला म्हणावें हा थेरडा खरा बाळ आहे आणि हा बाळ खरा थेरडा आहे–भलत्या नजरेनें पाहात नाहीं–कशी माझी महामति चालते आहे! आहे बुद्धि सोवळी, द्या बाबा टाळी.

बहु०:—एक वर्षभर मेध्यारण्यांत राहून सावित्री काय करणार?

गाय०:—मी सांगूं काय करणार तें? अहो साल्व देशचे द्युमत्सेन महाराज अंध होऊन ह्या मेध्यारण्यांत राहत आहेत ना? त्यांचा मुलगा सत्यवान–तुम्ही पाहिला आहे सर्वांनीं–असा दिव्य पुरुष दुनियेंत दुसरा नाहीं दृष्टीस पडावयाचा–त्या सत्यवानावर सावित्रीचें प्रेम बसलें असून—

महा०:—एव्हांच प्रेम बसलें देखील! बाबा, ह्या प्रेमावर बिब्बा घातला पाहिजे–मी जंगली होऊं लागलों आहें–गायत्री माझ्या ह्या नव्या जटेकडे पहा–आहे सत्यवानाची जटा एवढी मोठी? माझी जटा जंगली, द्या बाबा टाळी–जटेंत सत्यवानाला चीत केला–सावित्रीनें गर्वानें मला जरी झिडकारलें तरी ह्या शंकराचे जटेंत गंगेप्रमाणें तिला अडकून पडावें लागेल आणि माझ्यावर खरें प्रेम करणाऱ्या एखाद्या चंद्रकलेला मी मस्तकावर धारण करीन–ह्याला म्हणतात सावित्रीच्या आणि सत्यवानाच्या प्रेमावर घालावयाचा बिब्बा–कसा आहे बिब्बा, द्या टाळी बाबा–ह्या जंगलांतलें बिब्याचें झाड मी झालों आहें–सुमति काका तुम्ही घ्या हा बिब्बा आपल्या हातांत–धरा माझा हात–होऊं द्या कलीचा प्रवेश माझ्या बिब्याचे मार्फत तुमच्या शरीरांत–सुमति

काकांचा चेहरा बदलला, बाबा चालला कली अंगांत शिरत—उतायला लागला बिब्बा, ह्या टाळी बाबा—

**सुम०:**—महाराज द्युमत्सेन व महाराज्ञी शैब्या ह्यांचें दर्शन मी नुकतेंच घेतलें; अश्वपति महाराजांचा व द्युमत्सेन महाराजांचा फार स्नेह, साल्व देश म्हणजे मद्र देशाचेंच भावंड असें अश्वपति महाराज मानतात; पण द्युमत्सेनाच्या घरांतल्याच शत्रूनें अवचित साल्व देशाचें राज्य कसें बळकावलें आणि द्युमत्सेन महाराजांना अंधळें करून ह्या मेध्यारण्यांत कसें सोडून दिलें, आम्हाला कांहीं ह्यांतलें आतापर्यंत कळलेंहि नाहीं.

**गाय०:**—ज्या शिबिराजानें कपोताला आपल्या अंगांतलें सर्व मांस खाऊं दिलें पण वचनभंग केला नाहीं त्या शिबिराजाचे घराण्यांतील शैब्या द्युमत्सेन महाराजांची राणी असल्यामुळें, गेलेलें राज्य नवऱ्याच्या किंवा मुलाच्या पराक्रमानेंच परत मिळालें पाहिजे, असा आग्रह सत्यवानाच्या आईनें धरला, आणि मेध्यारण्यांतील च्यवन ऋषींनीं स्थापिलेल्या अश्विनी कुमारांच्या आयुर्वेदाच्या पीठांत बाबांच्या डोळ्यांना पुन्हां दृष्टि येईतों राहून, आईबापांच्या सेवेनें श्रीशंकराला प्रसन्न करून स्वतःच्या पराक्रमानें साल्व देशाचें राज्य परत मिळवावयाचें, अशी प्रतिज्ञा सत्यवानानें केली!— त्या प्रतिज्ञेप्रमाणें—

**महा०:**—जन्मभर जंगली, भिकारी, व मधुकरी सत्यवान राहणार!— तशीच ती प्रतिज्ञा आहे; पण सत्यवानाची प्रतिज्ञा खुशाल पुरी होवो, ह्या जंगल्याचें त्यांत कांहीं नुकसान नाहीं—अश्विनी कुमारांनीं च्यवन ऋषींचे डोळे परत आणले व च्यवन-प्राश औषधाच्या सेवनानें च्यवन ऋषी तरुणहि झाले, पण हें सर्व सुकन्येमुळें झालें; द्युमत्सेनाला डोळसा कोणती सुकन्या करणार? सुकन्येसारखी पतिव्रता आजकाल आहे कोठें? द्युमत्सेन जन्माचा आंधळा राहणार, गौतम मुनींच्या ह्या आयुर्वेदाच्या पीठांत सत्यवानाला मरेतों सेवेकरी म्हणून राबावें लागणार, आणि वर्ष सहा महिन्यांत कंटाळल्यावर सावित्रीचें प्रेम बदलून

कोणावर बसणार-कोणावर गायित्री, कोणावर सुमतिकाका, कोणावर-मग माझी पाळी द्या बाबा टाळी—

**सुम०:**—बहुबुद्धि, आपण आणि मी जरा एका बाजूस दोन घटका बसून वल करूं या म्हणजे पुढचा मार्ग कांहीं तरी दृष्टीस पडेल—

**बहु०:**—चला आपल्या शिबिरांत, गायत्री तूंहि ये आमच्याबरोबर. सत्यवानाचें हें नवें विघ्न उत्पन्न झालें आहे; ह्यावर कांहीं तरी तोड काढल्या शिवाय सोय नाहीं,—नांवाचा बहुबुद्धि आहे, अशी नाहीं तशी, तशी नाहीं अशी—ही नाहीं ती, ती नाहीं ही—पाहिजे ती बुद्धि चालवून प्रसंगांतून पार पडून जाईन—चलावें सुमति—चल गायत्री. [ सुमति व बहुबुद्धि जातात.

**महा०:**—ए गायत्री, जरा थांब, खरें खरें सांग,—सत्यवानावर सावित्रीचें मन कितपत बसलें आहे, खरें खरें सांग,—वरवर बसलें आहे, कंटाळण्या पंखातलें बसलें आहे—दोन दिवसांच्या वनभोजनापुरतें आहे—पुन्हां परत फिरणारें आहे किंवा नाहीं; आहेना परत फिरणारें?—गायत्री मला तुझा संशय येतो, सावित्रीचें मन माझ्यावर न बसतां इतरावर कसें बसलें, गायत्री तुझा संशय मला येतो—सावित्रीच्या नव्या प्रेमाचा उलगडा झाला बाबा—सगळें समजलें मला बाबा, ह्या गायत्रीचे हे खेळ आहेत—ही खेळ खेळी, द्या बाबा टाळी—गायत्री तुझ्याबद्दलचा संशय पक्का झाला आतां—

**गाय०:**—मीं काय केलें ह्यांत?

**महा०:**—सांगूं काय केलेंस तें! अग तुझें मन माझ्यावर आहे म्हणून तूं सावित्रीला सत्यवानाचा नाद लावलास—होयना—असेंचना—आतां ओळख पटली, द्या बाबा टाळी—अग तूं मला वडिलांसारखीच आहेस—बाबाच तूं माझा—आतां ओळख पटली, द्या बाबा टाळी—

**गाय०:**—( स्वगत ) ह्याला आतां पुरा खुषमस्कऱ्या बनविला पाहिजे; अरण्यांत असतांना वेळ जावयाला ही मौज कांहीं वाईट नाहीं.—( उघड ) मी तुम्हाला आईसारखी आहें, दोन गोष्टी तुम्हाला सहज शिकवीन, खरें

सांगू तुम्हाला, तुम्ही पुरते तपस्वी झाल्याशिवाय तुमच्यावर कोणाचेंच मन बसणार नाहीं.

**महा०:**—माझे बाबा, माझी आई, मी जंगली झालोंच आहें, जटेवर रुद्राक्षाच्या माळा घातल्या, गळ्यांत, हातांत, दंडावर, चोहोंकडे रुद्राक्ष लोळत राहिले म्हणजे झालोंच मी तपस्वी—

**गाय०:**—रुद्राक्षाच्या माळा नकोत–बिब्याच्या माळा घाला–बिब्याच्या माळा तुम्हाला फार शोभतील–बिब्याच्या माळा घाला आणि पहा कोणाचें मन कोणावर कसें बसतें तें.

**महा०:**—माझें आणि तुझें मत अगदीं बरोबर जुळतें–मी बिब्याच्या माळा तयार करून ठेवल्या आहेत–घालशील तूं बिब्याची माळ माझ्या गळ्यांत–का मी घालूं बिब्याची माळ तुझ्या गळ्यांत–ही पहा बिब्याची माळ–आहेना तपस्वी होण्याची तयारी–कुळकुळीत काळी, द्या बाबा टाळी.

**गाय०:**—माझ्या नका गळ्यांत घालूं–गायत्रीला बिब्याचा स्पर्शहि चालत नाहीं हो–डोक्यावर, अंगाखांद्यावर, दंडांत, हातांत, बिब्याच्या माळा तुम्हीच घाला–सुमति मंत्र्यांनी मला बोलावलें आहे तिकडे मी जातें. [ जाते.

**महा०:**—जा, जा, तुझ्या नशिबीं आहे कोठें हें वैभव पहाण्याचें ?–( बिब्याची माळ घालून ) ह्याहून अधिक तपस्वी कोण असणार ? रुद्राक्षांवर ह्या काळया कुट्ट बिब्यांनीं ताण केली असल्यामुळें मी प्रत्यक्ष मृत्यूचा अवतार दिसणार–शंकराहून माझाच गाजावाजा मेध्यारण्यांत अधिक होणार–मी यमासारखा दिसतों का यमाच्या रेडयासारखा दिसतों–कोणाला विचारावें–ही कल्याणी इकडेच येत आहे–ऋषिकन्या असल्यामुळें खरें सांगेल—[ कल्याणी येते. ] ए कल्याणी, अशी ये–माझें रूप–माझी जटा–ह्या माळा–सर्व नीट पहा, आणि सांग मी कसा दिसतों तें; यम कीं यमाचा रेडा ? भ्याली कल्याणी–बोबडी वळली, द्या बाबा टाळी–न भितां सांग कसा दिसतो तें.

**कल्या०:**—आपण मूर्तिमंत मृत्यूच आहां असें दिसतें; मी येथें कोठून

आलें चुकून कोण जाणें–राजकन्या सावित्रीचें दर्शन घ्यावें म्हणून मनांत आणलें तों हें प्रत्यक्ष मरणच माझ्यापुढें उभें!–देवी सावित्रीचें दर्शन ह्या ऋषि–कन्येला होईल काय?

**महा०:**—मी तुला सावित्रीची सर्व हकीकत–जन्मल्यापासून मेल्यापर्यंतची सर्व हकीकत सांगतों, म्हणजे तिला प्रत्यक्ष पाहिल्याचेंच पुण्य तुला लागेल.

**कल्या०:**—असे जरा जिवंत माणसारखें बोला; तुम्ही मृत्यु नाहींना?

**महा०:**—मी मेलेला नाहीं, जिवंत आहें आणि माणूस आहें–आहेंना माणूस? ना गाय ना शेळी, ह्या बाबा टाळी– विचारा प्रथम सावित्रीची हकीकत मला आणि मग जा तिला प्रत्यक्ष पहावयाला.

**कल्या०:**—ह्या अरण्यांत प्रत्यक्ष देवतेप्रमाणें चमकणारी, गौतम मुनींच्या आयुर्वेदाचे पीठांतील सर्व तपस्व्यांना चकित करून सोडणारी, व सर्वांचा जीव कीं प्राण असलेल्या सत्यवान राजपुत्राला आपल्या लावण्यानें मोहित करणारी ही सावित्री कोण?

पद १० राग–खमाज, ताल–त्रिवट; चाल–"देखत नैनन."

**कोण कुणाची, वद्वी वचना। उत्कट गुणगण स्थान कीर्तना ॥ धु० ॥ सद्गुण माला, सुंदर बाला। विभूति आश्चर्यचि लोकांना ॥ १ ॥**

सांगा ही सावित्री कोण व आमच्या मेध्यारण्यांत कां आली आहे?

**महा०:**—(स्वगत) सत्यवानाच्या प्रेमावर बिब्बा घालण्यास बरी संधी मिळाली; आतां कल्याणीच्या कानाला चावा घेतों म्हणजे आपोआप सर्व तपस्वी सावित्रीच्या विरुद्ध उठतील.–(उघड) सांगतों ऐक सावित्री कोण आहे तें.–अश्वपति राजाची ही मुलगी फार रूपवान आहे आणि बुद्धिमानहि आहे; पण एक मोठी गोम आहे; मनुष्याची घाण हिला जशी आहे तशी जगांत दुसऱ्या कोणांतहि सांपडणार नाहीं.–येथें कां आली सांगूं?

**कल्या०:**––तेंच मी विचारतें आहें.

महा०:—अग, हिला नवराच मिळेना, कोणीहि राजपुत्र किंवा माझ्या सारखा मंत्रीपुत्र ही घोरपड गळ्यांत बांधून घेण्यास तयार होईना—

कल्या०:—सावित्रीसारखी तर सुंदर व शहाणी कोणी नाहीं, असें म्हणतात.

महा०:—सुंदर आहे, पण सौंदर्यापेक्षां गर्वच अधिक आहे; शहाणी आहे, पण शहाणपणाची घमेंड अधिक आहे;-पावलोपावलीं नाक मुरडतांना व डोळे मिचकावतांना डोक्यावर मिरें वाटणारी बायको कोण करून घेणार?-अति सुंदर, अति शहाणी, सर्व कांहीं अति; अति तेथें माती-सर्वांनीं टाकली, द्या बाबा टाळी-दे ना टाळी- दूर दूर कां जातेस-दे ना टाळी-मारना हातावर हात—

कल्या०:—कोण मारणार तुमच्या हातावर हात-असले मूर्ख मागणी करायला आल्यावर कोण लग्नाला तयार होणार? [ जाते.

महा०:—गेली, गेली तर गेली; सावित्रीच्या आणि सत्यवानाच्या प्रेमावर बिब्बा घालायला तर कमी केलें नाहीं. सावित्रीला वरायला दुनियेंत कोणी तयार नाहीं, ही बातमी हां हां म्हणतां मेध्यारण्यांत झाडेंझुडपेंहि बोलूं लागतील. बाबा आणि सुमतिकाका खुशाल खलबत करीत बसूं देत, बिब्याचा मारा मीं सुरू केला आहे, आणि ऋषिकन्येबरोबरच्या पहिल्या चकमकींत माझी सरशी होऊन मी ऋषिकन्येचा पाठलाग करायला निघालों आहें-बाबा, तुमच्या मुलाची फत्ते झाली, द्या बाबा टाळी. [ जातो.

---

## प्रवेश तिसरा.

[ *स्थळ*—मेध्यारण्यांतील लता-मंडप; सुमति व बहुबुद्धि येतात. ]

सुम०:—आतां इतक्यांत मला अक्कासाहेब येथें दिसल्या-अं--अं-गेल्या कोणीकडे?

बहु०:—ह्या लतांच्या जाळ्यांत जरा नजर चुकली-त्या पहा तेथें फुलें तोडीत आहेत अक्कासाहेब.-दास, दासी काय कमी आहेत? ह्यांनीं फुलें काय

म्हणून तोडावयाचीं ?—ह्यांच्याकरितां फुलें तोडण्यांत यावींत, ह्यांनीं काय म्हणून फुलें तोडावयाचीं ?

**सुम०:**—हौसेला मोल नाहीं म्हणून म्हणतात तें हेंच; ऋषिकन्येप्रमाणें राबण्याची हौस आज राजकन्येंत दृष्टीस पडत आहे, आम्ही काय करणार ! बहुबुद्धि, मला हें लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं.

**बहु०:**—असले भिकार चाळे राजपुत्रांना व राजकन्यांना सुचायचेच; श्रीमंतांना भिकारी व्हावेंसें वाटतें, राजांना रंक सुखी दिसतो, आणि विद्वानांवर मूर्ख झालों असतों तर फार बरें झालें असतें असें म्हणण्याची पाळी येते !—हें असें फिरायचेंच रहाटगाडगें जगांत;—पोहरा भरून आला काय किंवा रिकामा गेला काय, वाईट वाटण्याचें कारण नाहीं.—सर्व लक्षण ठीक आहे—असें राबण्याची हौस राजकन्येची, आणि जंगलांतील विब्याचा खेळ खेळण्याची हौस माझ्या मुलाची—जशास तसें—सर्व लक्षण ठीक आहे—

**सुम०:**—लक्षण ठीक असो वा नसो, महाराजांना येथें कशाला बोलावलें पाहिजे, विचारून तर घेऊं या—( फुलें तोडीत सावित्री येते ) म्हटलें आक्कासाहेब, आज इतकीं फुलें कशासाठीं तोडावयाचीं ? आम्हाला कोणाला आज्ञा झाली असती तर—

**बहु०:**—मी स्वतः परडीभर फुलें तोडलीं असतीं—अजून सांगूं का माझ्या मुलाला आपल्याकरितां फुलें तोडावयाला, घटकेंत भाराभर फुलें तोडणारा आहे माझा महामती—लाकडांचा भारा सांगा किंवा फुलांचा सांगा, दोनहि कामें त्याला सारखींच—

**सुम०:**—पण आज इतकीं फुलें कशासाठीं ?

**सावि०:**—कशासाठीं ! तुम्हाला माहीत नाहीं ! मेध्यारण्यांत माझ्याबरोबर राहिला आहांत तरी कशाला !—द्युमत्सेन महाराजांच्या डोळ्यांना गुण पडावा म्हणून शैब्या महाराणी आज महादेवाची महापूजा बांधणार आहेत; पांढऱ्या शुभ्र हिमाचलाचीं गौरीशंकर हीं सर्वांत उंच असलेलीं शिखरें

फुलांच्या राशीचीं बनवावयाचीं असून, पार्वती-परमेश्वर त्या शिखरांच्या सिंहासनावर बसून सर्वांना दर्शन देणार आहेत; त्या महापूजेसाठीं हीं फुलें आहेत.-विश्वाच्या मातापितरांचें-पार्वती-परमेश्वराचें-आजचें दर्शन सर्वांचा उद्धार करणारें ठरल्यावांचून रहाणार नाहीं.

**सुम०:**—शैब्या महाराणीकडून व्हावयाच्या महापूजेसाठीं मद्र देशच्या राजकन्येकडून कां फुलें तोडण्यांत यावीत ?—आपण बांधलेल्या महापूजेचें दर्शन मेध्यारण्यांतील सर्व तपस्व्यांना व गौतमऋषींच्या आयुर्वेदाचे पीठांतील सर्व उपासकांना व्हावें, अशी जर सरकारची इच्छा असेल तर फुलांची महापूजा कशाला ? सोन्यारुप्याच्या पर्वताचे मोत्यामाणकांच्या शिखरावर विराजमान होणाऱ्या पार्वती-परमेश्वरांच्या हिऱ्याच्या मूर्ति सरकारचे जामदारखान्यांत आहेत, त्यांचा थाटाचा उत्सव सुरू करावा—

**सावि०:**—आणि द्युमत्सेन महाराजांची गेलेली दृष्टि लवकर परत येवो अशी प्रार्थना करून, सुरू केलेला उत्सव बारा महिने नवस म्हणून चालू ठेवावा, असें प्रथम मला वाटलें,-पण मीच होऊन तो बेत रहित केला.

**बहु०:**—अक्कासाहेबांची बुद्धि माझ्या बुद्धीहून अधिक चपल! माझ्या बुद्धीला समजायचे अगोदर अक्कासाहेबांना उमगतें! माझ्या मुलाचीहि बुद्धि अशीच जलद आहे-जरा मूळची बोजड आहे; महामतीच तो, बुद्धि महा वातुळ आहे; पण अशी लगबगीनें चमकत चालते, माझी धांदलच उडते !-माझ्या मनांत बेत रहित व्हावा असें आलें तों अक्कासाहेबांनीं बेत रहित केला! साल्वदेशच्या द्युमत्सेनाचें गेलेलें राज्य व दृष्टि परत मिळविण्याकरितां अश्वपति महाराजांचें वैभव काय म्हणून खर्ची घालायचें ?

**सावि०:**—बाबांची व द्युमत्सेन महाराजांची मैत्री विशेष आहे; आपणांस माहीत नाहीं का बहुबुद्धि ?

**बहु०:**—राज्य आणि मैत्री दोनहि एकदमच नाहींशी होतात; द्युमत्सेन, शैब्या व सत्यवान, तिघेहि दरिद्री होऊन अनाथाप्रमाणें गौतम ऋषींच्या

आश्रमांत पोटापाण्याच्या सोईसाठीं राहिल्यावर पूर्वीच्या मैत्रीची आठवण ठेवणें चांगलें नाहीं; तेव्हां हिऱ्याच्या भवानीशंकरांचें दर्शन येथील सर्व जंगल्यांना देण्याचा बेत अक्कासाहेबांनीं रहित केला हें योग्यच झालें; पण दरिद्रयाचे मठींतील महापूजेसाठीं आपण काय म्हणून फुलें तोडावयाचीं ?

**सावि०:**—दारिद्रय त्यांना आलें आहे खरें; पण मनानें, बुद्धीनें व आचरणानें ते आमच्याहून किती तरी पटीनें श्रीमंत आहेत. त्यांची ती सदाचाराची, सद्गुणांची व तपश्चर्येची श्रीमंती पाहून माझ्या त्या हिऱ्याच्या मूर्तींना पुढें करायला मी आपोआप लाजलें; म्हणून सुमतिकाका, तो बेत मीं रहित केला.—शैब्या महाराणी म्हातारपणींहि स्वतःच्या हातांनीं तोडलेलीं फुलें जेव्हां शंकराचे चरणावर ठेवतात तेव्हां सर्व विश्वाच्या मोलाचा नजराणा परमेश्वराच्या सिंहासनापुढें ठेवण्यांत येत आहे असें मला वाटतें !—देव भावाचा भुकेला आहे, हिऱ्यामोत्यांचा नाहीं; ह्या मेध्यारण्यांत दिसणाऱ्या भक्तिभावाचा अल्पस्वल्प तरी अंश आमच्या वांट्याला आला आहे काय ? शैब्याराणीची सेवा करून भक्तीच्या मार्गानें एखादें तरी पाऊल टाकावें, म्हणून मी हीं फुलें तोडीत आहे. अंध झालेल्या पतीची सेवा, शैब्या राणी स्वतः वृद्ध, कृश, व निःसत्व असतांहि किती दक्षतेनें करीत असते हें पाहिलें म्हणजे सद्वासनेचे धडेच सद्गुरु शिकवीत आहे, असें मनाला पटल्यावांचून रहात नाहीं. सोन्याच्या रथांतून फिरायचें सोडून देऊन अशी फुलें तोडीत मी प्रहरानुप्रहर रोज कित्येक महिने जेव्हां राबत राहीन, तेव्हां महापूजेकरितां माझ्या फुलांचा उपयोग कराल काय म्हणून विचारण्याचा थोडासा तरी अधिकार मला प्राप्त होईल. सुमतिकाका, मी फुलें नाहीं तोडीत, तर भक्तिमार्गाच्या शिक्षणांतलें धूळपाटीवरील पहिलें अक्षर मी कसेंबसें गिरवीत आहें ! सुमतिकाका, बाबांना लिहावयाचे पत्रांत मी शैब्या महाराणीसाठीं रोज फुलें तोडीत असतें म्हणून लिहावयाला विसरूं नका हं.

**सुम०:**—पण महाराजांना येथें बोलावलेंच पाहिजे का ? आपण सर्व

राजधानीला परत जाऊं आणि तेथें काय तो पुढील विचार ठरवूं; हें अधिक चांगलें नाहीं कां ?

सावि०:—आई, बाबा, दोघांनींहि येथेंच आलें पाहिजे. त्यांनीं आपल्या डोळ्यांनीं सर्वांना–सर्वांना पाहिलें, म्हणजे मला बोलायचेंच कारण उरणार नाहीं. नुसतें ऐकून भागणारें नाहीं, सर्वांना–सर्वांना–पाहिलें पाहिजे.

बहु०:—कालच्या पत्रांत मी मुद्याच्या गोष्टी लिहावयाच्या विसरलों होतों; आज अर्धवट पत्र लिहून ठेविलें आहे; त्यांत द्युमत्सेन महाराजांना आलेलें अंधत्व व दारिद्र्य ह्यासंबंधाची सविस्तर हकीकत लिहिली आहे; शिवाय गौतम मुनींनीं सत्यवानाची केलेली स्तुति—

सुम०:—धनुर्विद्येंत व अस्त्रविद्येंत गौतममुनींनीं सत्यवानाला पूर्ण पारंगत केलें असून, गेलेलें राज्य परत मिळविणें म्हणजे सत्यवानाच्या हातचा मळ आहे जसें गौतममुनींनीं कित्येक वेळां बोलून दाखविलें आहे ! इतका सद्गुणी व पराक्रमी शिष्य मला पुन्हां नाहीं मिळणार, अशी सत्यवानाची प्रशंसा करण्यांत गौतममुनींना तर धन्यताच वाटते; लिहिलें आहे ना हें सर्व पत्रांत ? धनुर्विद्येंत सत्यवानाचा हात धरणारा वीर पृथ्वीतलावर आज कोणींहि नाहीं—

सावि०:—गौतममुनी असें म्हणत होते ना ? अगदीं असेंच म्हणत होते ना ? होय ना ? सर्व पृथ्वी जिंकून सार्वभौमाचें वैभव सहज लीलेनें हस्तगत करण्याची शक्ति ज्यांच्या धनुष्यांत, त्यांना दरिद्री कसें म्हणायचें बहुबुद्धि काका —

बहु०:—ते नेहमीं दरिद्री राहतील असें नाहीं मी म्हणत, आज दरिद्री आहेत इतकेंच काय तें; पण गौतममुनींची तारीफ त्यांच्याच शब्दांत लिहिली आहे. आपणांस विचारावें आणि पत्र बंद करावें, म्हणून सरकारच्या दर्शनाला आलों.–मग पक्का ठरला का विचार महाराजांना येथेंच जंगलांत बोलावून घेण्याचा ?

[ महामति येतो.

महा०:—इतक्यांत नका बाबा महाराजांना बोलावून घेऊं; मी बिब्बा घातला आहे; कितपत उततो तें प्रथम पाहूं या; नाहींच बिब्बा उतला तर महाराजांना बोलावून त्यांच्या हातून बिब्याचें काम उरकून घेऊं—अरे वा—येथें राजकन्याहि आहे—उतणार बाबा बिब्बा—तो पहा सत्यवान इकडेच येत होता पण मला पाहून थबकला, लागला बिब्बा उतायला,—फुली बिब्याची काळी, द्या बाबा टाळी—

सावि०:—मी जरा त्यांच्याशीं ह्या फुलांसंबंधानें दोन शब्द बोलून येतें हं. [ जाते.

बहु०:—सत्यवानापुढें आमची किंमत कांहींच नाहीं—

सुम०:—बहुबुद्धि, असें आपण बोलूं नये—शिवाय हें साहजिकच आहे—तारुण्य व प्रेम ह्यांची संगति असावयाचीच—आम्ही वृद्धांनीं तरुणांना आपल्याप्रमाणें वृद्ध समजतां कामा नये—

महा०:—बाबांना व काकांना येथेंच तिष्ठत उभे करून राजकन्या सत्यवानाकडे गेली, हें वृद्धांचें जसें व्हावयास पाहिजे तसेंच झालें—पण बाबांना राग आला—वाईट वाटलें—क्रोध चढला कारण मला तरुणाला कस्पटाप्रमाणें लेखून सावित्री त्या जंगल्याकडे गेली—होयना बाबा, हेंचना वाईट वाटण्याचें कारण ?—तुम्हाला जसा संताप चढला तसा मलाहि चढला—पण मी संताप गिळून टाकला—तसा तुम्ही गिळा संताप बाबा—ज्यानें क्रोध जिंकला त्यानें राजकन्येलाहि जिंकलें म्हणून समजावें—राजकन्या जिंकली, द्या बाबा टाळी.—

सुम०:—सावित्री व सत्यवान बोलत बोलत इकडेच येत आहेत; आपण जरा येथून कांहीं वेळ दूर जावें हें चांगलें—

बहु०:—चल महामति, त्यांच्या एकांतांत तूं नकोस—चल—

महा०:—बाबा मी जंगली झालोंच आहें; आतां तपस्वी होऊन बायकामुलांसकट सर्व संसार, बाबा तुमच्यासकट सर्व संसार मी गिळून टाकतों—मग माझ्यापुढें सत्यवानाचें काय चालणार—काम क्रोध मी गिळी, द्या बाबा टाळी—

[ सुम० बहु०, व महा० जातात. सावित्री व सत्यवान येतात. ]

**सत्य०:**—सुमति व बहुबुद्धि येथून गेले हं !–ते फार दूर गेले नाहींत–महापुजेचें त्यांना आमंत्रण देऊन येतों; त्यांनीं दर्शनाला अवश्य आलें पाहिजे.

**सावि०:**—मजपाशीं त्यांचें आमंत्रण दिलें तर नाहीं का चालावयाचें ?

**सत्य०:**—खरें म्हटलें असतां आपणच मजकरितां ह्यापूर्वीच आमंत्रण देऊन टाकलें पाहिजे होतें–नाहींना दिलेलें आमंत्रण–नाहींना ?

**सावि०:**—मला जर कोणी अजून बोलावलें नाहीं, तर मी दुसऱ्यांना कशी आमंत्रण देऊं ?

**सत्य०:**—बोलावलें नाहीं–बोलावण्याची जरुरी आहेसें वाटतें ?–तुम्हाला मी आमंत्रण देत बसण्याची जरी जरुरी नसली तरी अश्वपति महाराजांच्या मंत्र्यांना मीं आमंत्रण देणें जरुर आहे–आलोंच मी आमंत्रण देऊन परत—

**सावि०:**—मी येथेंच उभी आहें; लवकर यावयाचें परत—

**सत्य०:**—हा आलोंच मी परत आपणालाहि आमंत्रण द्यावयाला—

[ जातो.

**सावि०:**—मला आमंत्रण–घरच्या घरीं कोण कोणाला आमंत्रण देणार ? जेथली मी मालकीण–मनानें झालेंच आहें, जनाच्या दृष्टीनें व्हावयाची आहें–जेथली मी मालकीण व्हावें म्हणून रोज जगदंबेची प्रार्थना करितें, तेथलें आमंत्रण मला कशाला ? मला कोणी बोलावलें नाहीं म्हणून मीं म्हटलें, बरें झालें–बोलावलें नाहीं, जरुरी आहेसें वाटतें ?–नाहीं हो जरुरी नाहीं–रात्रंदिवस आपल्या पायाची सेवा करणें हाच जिला मोक्ष वाटतो तिला कशाला पाहिजे आमंत्रण ?–आमंत्रणाची जरुरी नाहीं असें आपण म्हटलेंत, पदरीं घेऊन मला पवित्र केलेंत, महापूजेच्या मालकीचा हक्क सासूबाईच्याइतकाच माझ्याहि पदरांत टाकलांत आणि दुसऱ्यांना आमंत्रण देणारी आपल्या घरची मी मालकीण झालें–आपण परत आलां म्हणजे मीच पाहिजे तर आपणालाहि आजच्या महापूजेचें आमंत्रण देतें; कारण घराची मालकीण स्त्री, पुरुष मालक

नव्हे—झालेच मी मालकीण शैब्या महाराणीच्या घराची—माझ्याच घरांत आज पार्वती—परमेश्वराचें दर्शन सर्वांना होणार, मग आमंत्रण देण्याचा अधिकार तिकडच्याहून अधिक कां मला असूं नये ?

पद ११, राग—भूप; ताल—त्रिवट; चाल—" तुम प्रभुजी. "

निज महिलामान राखिला । मम हातीं अधिकार फार आला
॥ धृ० ॥ मम पतिसेवा—भाव जाणिला । मंशय कसला, दीन
देह हा धन्य धन्य केला ॥ १ ॥

हे आले परत—कसें कोणत्या शब्दांनीं देऊं ह्यांना आमंत्रण ? [ सत्यवान येतो.

सत्य०:—( स्वगत ) त्यांना आमंत्रण दिलें; पण हिला कोणत्या शब्दांनीं देऊं आमंत्रण !

सावि०:—( स्वगत ) ह्यांना पाहिलें म्हणजे वाचाच बंद होते—कसें मला कांहीं आठवेनासें झालें—ह्यांच्याहून निराळी मी असलें तर आमंत्रण देणार किंवा घेणार—काय करूं—ह्यांना आमंत्रण देऊं का आमंत्रण पोहोंचलें म्हणून सांगूं ? ( उघड ) नका हो, आपण इतके श्रम घेऊं नयेत—मला आमंत्रणाची काय जरुरी ?—मीच पाहिजे तर सर्वांना—सर्वांना—आपणाला देखील—देऊंना मी असें आमंत्रण ?

सत्य०:—असें गोड आमंत्रण कोण स्वीकारणार नाहीं ? महापूजेचें आमंत्रण दिलें, आतां महापूजेकरितां लागणारीं सर्व फुलें स्वतः तोडलीं पाहिजेत. आजच्या महापूजेकरितां मी एक देखील फूल तोडणार नाहीं.

सावि०:—हीं पहा मीं इतकीं फुलें तोडलीं आहेत—आणखी लागेल तितकीं फुलें मी तोडतें—सर्व फुलें मी एकटीच तोडतें—

सत्य०:—पण इतके श्रम राजकन्येनें सोसणें चांगलें नाहीं.

सावि०:—आवडतें काम म्हणजे श्रम नव्हेत—आपणाला जें आवडतें तें मलाहि आवडतें—आपले श्रम मजमुळें वांचतात व आपण आनंदी होतां, म्हणून

असले श्रम मला सुखसोहळ्यासारखे वाटतात–तोडूं ना अशींच आणखीं फुलें ?

**सत्य०**:—माझ्या आईची सेवा माझ्या बदलां तूं करीत आहेस; तुझी सेवा आईला मान्य होणारी आहे आणि मलाहि–मलाहि–जाऊं दे तें–कांहीं कांहीं गोष्टी न बोलणेंच अधिक चांगलें.

**सावि०**:—मी माझ्या आईबापांना पत्र लिहून येथें बोलावलें आहे; ते येथें येऊन पोहोंचेतों–कांहीं–कांहीं–गोष्टी न बोलणेंच अधिक चांगलें !–पांच सात दिवसांत बाबा, आई, सर्व येथें येऊन पोहोंचतील—

**सत्य०**:—अश्वपति महाराज व मालवी महाराणी पांच सात दिवसांत येथें येऊन पोहोंचणार–काय म्हणतेस पांच सात दिवसांत !–राजकन्ये, मेध्यारण्यांत तूं आलीस, अगदीं पहिल्या दिवसापासून मला एकांतीं विचार करायला एक क्षणहि मिळाला नाहीं.–आईबापाची सेवा करावी आणि राहिलेल्या वेळांत कांहीं विचार करायला जावें तों डोळ्यापुढें तुझी मूर्ति उभी, असा तूं माझ्यावर पहारा ठेविला आहेस. आज महापूजेच्या वेळीं तुझ्या प्रत्यक्ष सहवासाशिवाय एक क्षणहि जाणार नाहीं. मग पांच सात दिवसांत अश्वपति महाराज आले म्हणजे मी त्यांच्याशीं काय बोलूं ?–मला नीट विचार केला पाहिजे; भलत्याच थराला आम्हीं दोघेंहि नकळत वाहत चाललों तर नाहींना ? माझ्यामुळें तुझ्या हातून अविचार झाला, असें होतां कामा नये; म्हणून म्हणतों आजचा महापूजेचा दिवस असाच जाऊं दे; उदईक दोन घटका तूं आणि मी सर्व गोष्टी संथपणानें बोलूं, मग मला जर पसंत पडलें तर अश्वपति महाराजांना बोलावून घे.–ह्या जन्माच्या गोष्टी आहेत, घाई करून काय करावयाचें ?

**सावि०**:—घाई कसली !—सर्वांना जी गोष्ट माहीत झाली आहे ती आम्हीं दोघांनीं मात्र एकमेकापासून चोरून ठेवणें कसें सुखाचें होईल ?–ही शब्दांची चोरी मला नाहीं बाई ह्यापुढें सोसवत !

**सत्य०**:—तुझ्याप्रमाणें मीहि उतावीळ नाहीं, असें का तूं समजलीस ?–

शब्दांचा आडपडदा दूर होऊन विरहाचे दिवस केव्हां संपतील, असें मला झालें आहे; पण काय करूं !

**पद १२, राग–जिल्हा पिलु, ताल त्रिवट; चाल–" पियाबिन चैन. "**

**प्रिय जरि हा सहवास मला। आवरी उतावीळ मनाला; बंध धर्म सकला ॥ ध्रृ० ॥ बंधन-योगें अमर संसार। चंचल दुःखचि तो अविचार धरीना संतोषाला ॥ १ ॥**

पण ह्या कामीं घाई होऊं नये, सर्वांचा विचार घेऊन मग कायतो कायम निश्चय ठरवावा, आणि सर्वांचा विचार घेण्यापूर्वी तूं माझा विचार प्रथम समजावून घेतला पाहिजेस;–पटतेंना माझें म्हणणें तुला ?

**सावि०:**—आपली कोणती गोष्ट मला पटत नाहीं ? बाबांना आणि आईला तावडतोब या म्हणून मी कालच स्वतः पत्र लिहिलें; बाबा येतील आणि वडील माणसांचें आपआपसांत बोलणें होऊन इकडच्या मर्जीप्रमाणेंच सर्व कांहीं घडून येईल.–तसें व्हावें म्हणूनच आजची महापूजा आहे; आणि ह्या महापूजेकरितां मी एकटीनेंच फुलें तोडावींत, ही माझी इच्छाहि आपण सफल केली आहे–हें सुचिन्हहि मला पटलें आहे.

**सत्य०:**— तुला सर्व कांहीं पटलें; पण मला अजून पटलें नाहीं.–दोन दिवस खुलासेवार बोलूं; अगोदर कोणताच निश्चय करूं नकोस–फुलें तोडण्याचें आजचें काम तूं करीत आहेस, तेव्हां गौतममुनींना व त्यांच्या शिष्यवृंदाला आमंत्रण द्यावयाला मला आयती फुरसत मिळाली आहे.–आजच नको अधिक बोलणें–आजच्या दिवस तरी न बोलणें चांगलें–महापूजेशिवाय इतर न बोलतां मी जातों हं सर्वांना आमंत्रण द्यावयाला–न बोलतां जातों–जाऊं न बोलतां ? [ जातो.

**सावि०:**—आणखी बोलायचें तें काय उरलें आहे ? बोलून ह्यापेक्षां अधिक काय आम्हीं एकमेकांना कळविणार ?–प्रेमाची धांव वाचेच्या पलीकडे

असतें; बोलतांहि येत नाहीं; आणि बोलायचेंहि नसतें.—पवित्र प्रेम म्हणजे परमात्म्याचाच अंश आहे; परमात्म्याप्रमाणें प्रेमाचा साक्षात्कार तेवढा होतो; आणि प्रेम परमात्म्याप्रमाणेंच शब्दापलीकडचें असून, बोलण्यानें गोंधळ तेवढा माजतो!

पद १३, राग—भीमपलास; ताल एकताल; चाल—"क्या करूं मैं."

योग्य न प्रेम वर्णना। वाणी, मति-मनसासह, प्रेम-धाम गांठीना॥ धृ०॥ ब्रम्ह सत्य मज प्रेमा, बहु रूपा बहु नामा घेईना। समता ती एक एक भगवाना॥ १॥

[ पडदा.

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळ—मेध्यारण्यांतील लतामंडप—सत्यवान व चित्राश्व प्रवेश करितात. ]

**सत्य०:**—माझें कुठें काहीं चुकतें आहे, अशी का आईची समजूत झाली आहे?—महापूजेच्या वेळेला मी फार जपून वागलों.—सावित्रीशीं बोलण्याचें टाळतच होतों—

**चित्रा०:**—दुसऱ्या कोणाशीं त्या दिवशीं एक शब्द तरी आपण बोललांत का?

**सत्य०:**—सावित्रीकडे कांहीं केल्या वळून पहावयाचें नाहीं, असा निश्चयच केला होता; आणि पाहिलेंहि नाहीं पण वळून—

**चित्रा०:**—ती तुमच्यापुढें आणि तुम्ही तिच्यापुढें एकसारखे उभे होतां—सूर्यानें आपल्या प्रभेकडे वळून का पहावयाचें असतें?

**सत्य०:**—आईच्या सेवेंत अंतर पडूं नये म्हणून आईजवळ सारखा उभा होतों—

**चित्रा०:**—मातुश्रींची सर्व सेवा राजकन्येनें स्वत: केली—ह्या सेवेमुळें मातोश्रींच्या मनांत आलें आहे—

**सत्य०:**—काय आलें आहे मनांत? माझ्याकडून काहीं चूक होत आहे, असें तुला वाटतें का चित्राश्व?

**चित्रा०:**—महापूजेच्या वेळीं जी गोष्ट सर्वांना कळून चुकली ती छपविण्याचा घाट आपण घालतां, ही मोठी चूक होते आहे आपल्या हातून—मातोश्रींपाशीं स्वच्छ स्वच्छ एकदां बोलून टाकिनास? कळलें आहे सर्व कांहीं, मग छपवाछपवी कशाला?

**सत्य०:**—आईपासून कांहींच चोरून ठेवण्याची जरुरी नाहीं–पण इतक्यांत आईला नको होतें कळायला–पण काय करूं, सावित्रीला आपलें मन आवरून धरतां येत नाहीं—

**चित्रा०:**—आणि सत्यवानाला आपल्या मनांतलें सत्य झांकून ठेवतां येत नाहीं—

**सत्य०:**—अशी होत चालली आहे माझी फजिती.

**पद १४, राग–बिहार, ताल–त्रिवट; चाल–" धनुकबान."**

**पिता तापसचि तापस माता। तापस मी, तप मुख्य देवता।**
**तापस ना धरि लग्नपात्रता ॥ धृ० ॥ नोहे लग्न, विघ्न हें।**
**होईल विजोड राजदुहिता। मिरविल जरि आप्तावरि प्रभुता**
**॥ १ ॥**

चित्राश्व, ह्यापुढें मला अधिक सावधपणानें वागलें पाहिजे. मी चुकतों आहें, असें तर आईला नाहीं ना वाटत? मी पाहत आहें, सावित्रीशीं आई ममतेनें वागते, आणि प्रेमळ पण आज्ञाधारक दासीप्रमाणें आईची सेवाचाकरी सावित्री करीत असते; पण आईपाशीं बोलण्याचें धाडस कसें करूं असें मला झालें आहे.

**चित्रा०:**—मी बोलूं का आईपाशीं?–मित्रकार्य आहे; मग मी संकोच कशाला करूं? दुसऱ्यासंबंधानें बोलतांना सर्वांना पांडित्य सुचत असतें—

**सत्य०:**—पण तुझें पांडित्य एखादेवेळेला माझ्याविरुद्ध वाहूं लागावयाचें, ही भीति आहे ना? तेव्हां सध्यां तूं कांहीं बोलूं नकोस. सावित्रीची गांठ घेऊन मी थोड्या वेळांत येतों, तोंपर्यंत आईच्या सेवेंत अंतर पडूं देऊं नको—

**चित्रा०:**—राजकन्या मेध्यारण्यांत असेतों मातोश्रींची सेवा माझ्या एकट्याच्याच वाटणीला येणार, असें दिसतें!–मित्रा तूं सावित्रीची सेवा नीट कर, मी तुझ्याबदली मातोश्रींजवळ राहतों.–कांहीं भलतें सलतें आईच्या मनांत येऊंच देत नाहीं; पहारा करतों मातोश्रींच्या मनावर, काळजी करूं नको. [ जातो.

सत्य०:—महापूजेनंतर सावित्रीसंबंधानें आई कांहीं तरी मजपाशीं बोलेल, असें वाटलें होतें; पण जसें कांहीं झालेंच नाहीं, अशी मौन-वृत्ति सर्वांनीं धरली आहे.—अश्वपति महाराजांनीं उद्यां लग्नाची गोष्ट काढली, वडिलांना सध्यांच्या स्थितींत नकोसें वाटलें—नकोसें वाटणें हेंच आज रास्त होय—आईबापांच्या मनाची कुचंबणूक मीं करीत आहें काय ?—माझ्यापासून सुख होण्याऐवजीं—माझ्या लग्नाचा जांच होणार आईला—आम्ही सध्यां शतदरिद्री, राजकन्या असलेल्या सुनेचा उलटा सासुरवास माझ्या आईला झाल्यावांचून कसा राहील ?—माझ्याकडे पाहून आई संमति देईल, नाहीं असें नाहीं—पण ती आईची सेवा नव्हे, आईबापांनीं केलेली माझी सेवा होय—आपत्तीमुळें व वार्धक्यामुळें माझ्या आईचें जीवित अतिशय सूक्ष्म व हळुवार झालें आहे; चुकून थोडासा जरी विरूद्ध वारा अंगावरून गेला तरी तेवढ्यानेंहि सर्वस्वाची हानि होण्याचा संभव आहे.—माझें लग्न म्हणजे आईबापावर कोसळून पडणारें एक मोठें विघ्नच होय. बाबांच्यावरचें अरिष्ट टळेतों आणि आईचे काळजीचे दिवस संपेतों लग्नाचा विचार मी मनांतच आणतां कामा नये.—हें सर्व खरें, पण सावित्रीला पाहिल्यावर हा विचार टिकतो कोठें ?—ही लागली दिसायला सावित्री, लग्न न करण्याचा विचार चालला मागें हटत—काय करूं, हिला पाहिल्यावर कांहींच निश्चय करवत नाहीं.—आईहून अधिक हुकमत माझ्या मनावर चालविणारी ही कोण ?—

पद १५, राग—कर्नाटकी आनंद भैरवी; ताल—त्रिवट; चाल—" ध्रुवसमया."

**नयनीति ही बहु प्रेमळा। मज धर्म हा समजाविला ॥ ध्रु० ॥**
**कुपथा मना कधिं दाविना। विमल अबला दे नरा बला ॥ १ ॥**

एकदां सावित्रीला सर्व कांहीं स्वच्छ स्वच्छ सांगून मोकळें व्हावें, हें बरें.

[ सावित्री येते.

सावि०:—आज निश्चय करायचाना ?—वाङ्निश्चयाला कांहीं वडील माणसांची आज्ञा घ्यावी लागत नाहीं.

सत्य०—हें कोठून शास्त्र तूं काढलेंस ? गायत्री मंत्रानें केलेल्या मोठ्या यज्ञांत अश्वपति महाराजांना स्वतः सावित्री प्रसन्न होऊन वर मिळाल्यामुळें तूं जन्मास आलीस आणि तुझें नांव सावित्री ठेवण्यांत आलें, गुरुपाशीं चांगलें शिकलीस, हें सर्व खरें; पण तूं म्हणशील तसेंच लग्नाचें शास्त्र असलें पाहिजे असें नाहीं.—लग्नाला जशी वडिलांची संमति असावी लागते तशी वाङ्‌निश्चयालाहि असावी लागते; आणि मला तर आईबापांच्या आज्ञेशिवाय कोणत्याहि बाबींत एक पाऊलहि टाकावयाचें नाहीं. सावित्री, माझें सर्व दैवत माझे आईबाप; त्यांना सुखी करण्याहून निराळा धर्म मला माहीत नाहीं. त्यांचें जें सुख तें माझें सुख, त्यांचें जें दुःख तें माझें दुःख; म्हणून तुला सावित्री एकदाचें स्पष्ट सांगतों, आमच्या हल्लींच्या पर्णकुटिकेंत तुझ्यासारख्या राजकन्येचा निर्वाह लावणें माझ्या आईला संकटाचें वाटल्यावांचून राहणार नाहीं.—आईपाशीं संमति मागितल्यानें धक्का बसून आईचें हृदय दुभागलें जाण्याची भीति आहे; कसा मी वाङ्‌निश्चयास तयार होऊं, सांग सावित्री.

सावि०—आईहून अधिक मोठें दैवत नाहीं, अशी आपली निष्ठा आहे; वडिलांच्या चरणीं सर्व तीर्थें आहेत, अशी आपली खात्री आहे; गुरुच्या आज्ञेबाहेर वागावयाचें नाहीं, असा आपला निश्चय आहे,—ह्या आपल्या सद्धर्माच्या आड मी कशी जाईन ? पृथ्वीला जिंकण्याचें सामर्थ्य ज्या बाहूंत आहे ते आपले बाहू मातापितरांच्या शुश्रूषेंत आणि गुरुच्या दारांत रात्रंदिवस राबण्यांत धन्यता मानतात—ह्या आपल्या सद्‌गुणांवरून जीव ओवाळून टाकावासें वाटतें. मातृदेवो भव,पितृदेवो भव,आचार्यदेवो भव,असें नुसतें म्हणतात पुष्कळ; पण ह्या सद्वर्तनाची खरी ओळख ज्यांना करून घ्यावयाची असेल त्यांनीं मेध्यारण्यांत येऊन आपलेंच दर्शन घेतलें पाहिजे. आपल्यापुढें पृथ्वीवरील सर्व राजपुत्र मला निस्तेज दिसतात; कारण आपल्या सद्‌गुणांचें वैभव तेजांत आकाशाच्या सूर्यालाहि फिकें पाडणारें आहे. पृथ्वीवरच्या दैदिप्यमान सूर्याचा महिमा जर मला आकलन करतां आला नाहीं तर गायत्री मंत्राच्या यज्ञापासून

मी फुकट जन्मास आलें असें होईल. महाराज, आपल्या मातोश्रींच्या मनाला वाईट वाटेल असें वागावयाला मी आपणास कधींच सांगणार नाहीं. मातोश्रींना वाईट वाटणार नाहीं, वडील नाराज होणार नाहींत, गुरुजी नापसंत म्हणणार नाहींत, अशी आपली खात्री मीं केली—तर—माझी याचना फुकट नाहींना जाणार ?

सत्य०:—तूं कशाला याचना करावयाला पाहिजेस ? मी हजार वेळां तुजपाशीं प्रेमाची याचना करीन;—पण—पण—माझ्या धर्माला—माझ्या व्रताला—शीलाला मी प्रेमाहून अधिक समजतों.

सावि०:—आपला धर्म व माझें प्रेम ह्यांचा विरोध आहे कोठें ? आपल्या धर्माची जोपासना करायला मी चुकलें तर माझें प्रेम कवडीमोलाचें नाहीं का ठरणार ? व्रत पाळतांना जर मी आपल्या उपयोगीं पडलें नाहीं तर निश्चयाची शक्ति प्रेमांत असते म्हणून म्हणतात तें खोटें नाहीं का व्हावयाचें ? माझ्यामुळें आपलें शील जर बिघडलें तर प्रेमांत अमृत नसून वीषच असतें, असा काळिमा सर्व सतींना लावण्याचें पाप माझ्या हातून नाहीं का घडणार ?

सत्य०:—तुझ्या शुद्ध प्रेमाबद्दल मी साशंक आहे, असें कां समजलीस ? शीलाचा महिमा जसा तूं ओळखतेस तसा प्रेमाचा प्रभाव मी ओळखतों. माझें व्रत किंवा तुझें प्रेम ह्यामध्यें विरोध नसून, विरोध आहे तो राजकन्येची स्थिति व गौतम ऋषींच्या मठांतील सेवेकऱ्याची स्थिति ह्यांमध्यें आहे.

सावि०:—महापूजेच्या वेळीं हा विरोध कोठेंच दिसून आला नाहीं.—ऋषिपत्नींना व ऋषिकन्यांना मी कोणी परकी आहें, असें वाटलेंच नाहीं; त्यांचे फुलापत्रीचे अलंकार मीं अंगावर घातले व माझे हिऱ्यामोत्यांचे अलंकार मीं त्यांना दिले. मठांतील हिऱ्यामोत्यांचें रक्षण कोण करील असें सहज कोणी बोललें असतां विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण जसें श्रीरामचंद्रानें केलें त्याप्रमाणें मेध्यारण्याचें रक्षण करवयास इकडचें धनुष्य समर्थ आहे, असें सर्व स्त्री-पुरुषांनीं एकदम उत्तर दिलें. जेथें वीरश्री तेथें राजलक्ष्मी, विरोध कोठें आहे ? मेध्यारण्यांत कोणीच माझ्या विरुद्ध नाहीं. लता, वृक्ष, पशुपक्षी, तपस्वी,

सेवेकरी–कोणी कोणी माझ्या विरुद्ध नाहीं. दुसऱ्याला आपल्यापासून कांहीं त्रास होईल काय, असल्या सात्त्विक नाजुकपणामुळें जी भीति थोर विमूर्तींच्या मनांत घर करून बसते ती मात्र ह्यावेळीं माझी सवत होऊं पाहत आहे. सर्व–सर्व माझ्या बाजूचीं आहेत–आपल्या मातोश्री, माझ्या सासूबाई—

**सत्य०:**—हें कांहीं अजून मला पटत नाहीं–माझी आई, तुझी सासू–नाहीं पटत, अजून पटत नाहीं हें माझ्या मनाला.

**सावि०:**—असली सून पाहिजे, असे उद्गार ज्या वेळीं ऋषिपत्नींच्या तोंडून निघाले त्या वेळीं काय म्हणाल्या–आठवत नाहीं काय ?

**सत्य०:**—मी त्या वेळीं गुरुजींशीं बोलत होतों, आई काय म्हणाली मला ऐकूं आलें नाहीं–सांग आई काय म्हणाली तें–सांगना आई काय म्हणाली—

**सावि०:**—सांगूं ? सांगूं–सासूबाई म्हणाल्या–सासूबाई—

**सत्य०:**—सासूबाई नको म्हणूं–माझी आई काय म्हणाली ?

**सावि०:**—आपल्या मातोश्री–माझ्या सासूबाई म्हणाल्या–होय सासूबाई म्हणाल्या–ऐकायचें नाहीं वाटतें मी काय बोलतें तें–म्हणाल्या–सासूबाई म्हणाल्या–नाहीं ऐकावयाचें तर मी तरी कशाला सांगूं ?

**सत्य०:**—सांगना आई काय म्हणाली तें–सांगना—

**सावि०:**—सासूबाई म्हणाल्या–सासूबाई काय म्हणाल्या तें ऐकायचें असलें तर सांगतें, नाहीं तर नाहीं–सांगूं सासूबाई काय म्हणाल्या तें ?

**सत्य०:**—सांगना–सांग–बरें सांग, सासूबाई म्हणाल्या—

**सावि०:**—सासूबाई म्हणाल्या, अशी सून मिळायचें भाग्य कोठें आहे आमचें ? होयना, असेंच म्हणाल्या ना ?–होय, त्यावेळीं ऐकणें झालें होतें–माझ्या तोंडून वदवायचें होतें म्हणून आठवण नाहींशी झाली होती–होयना, असेंचना ?

**सत्य०:**—तुझ्या असल्या प्रेमळ लाजण्याच्या अंगीं विनोदानें क्षणभर सत्याची लपवालपव करण्याची हौस तपस्व्यांतहि उत्पन्न करण्याची शक्ति आहे;

पण विनोदाकरितांहि मी अन्यथा बोलणारा नाहीं—मी खरेंच आई काय बोलली तें ऐकलें नाहीं.

**सावि०:**—आतां तरी ऐकणें झालें ना? अशी सून मिळायचें भाग्य अहे कोठें—आमचें—ऐकणें झालेंना?

**सत्य०:**—तुझी प्राप्ति होण्याइतकें माझें भाग्य—माझें दैव कसें आहे, उघड—उघड—माझ्या स्थितीवरून दिसत आहे—माझ्या नशिबीं काय लिहिलें आहे हें कोण पाहिजे तो वाचूं शकेल—आई म्हणाली, अशी सून मिळायचें भाग्य अहे कोठें आमचें—हे उद्गार दुःखाचे आहेत—निराशा भरलेली आहे—भलत्या नादीं लागूं नकोस असा मला इषारा आहे—सावित्री, तुला खरें खरें सांगतों, सांप्रतची आमची कंगाल स्थिति आईच्या मनाला डंवचत असली पाहिजे—

**सावि०:**—पण सून म्हणून मी नको, असें कांहीं त्यामुळें होत नाहीं.

**सत्य०:**—नको असें जरी नसलें तरी पाहिजेस, असाहि आग्रह त्या उद्गागारांत नाहीं.—आईचें मन दुःखीकष्टी आहे, तेव्हां आईची काळजी दूर होईतों मी लग्नाचा विचार करणें म्हणजे अविचारच होय.

पद १६, राग—तिलंग, ताल—झपताल; चाल—"मोहन मुरलिधुन."

**दुःखांत मन मुरत, सौख्यासि साहिना। परिणाम गोड नच, समया जुळेना ॥ धृ० ॥ प्रतिकूल काला, अविचार झाला। प्रतिकूल परिवार, विरोध टळेना ॥ १ ॥**

सावित्री, अविचाराबद्दल स्त्रियांपेक्षां पुरुषांना अधिक जबाबदार धरतात वाङ्निश्चयाचा हा अविचार मला मुळींच पसंत नाहीं.

[ बहुबुद्धि व सुमति येतात.

**बहु० व सुम०:**—आम्हालाहि हा अविचार पसंत नाहीं.

**सावि०:**—कोणता अविचार तुम्हांला पसंत नाहीं?—पाहिजे तो वर पसंत करण्याकरितां बाबांच्या आज्ञेनें मी सर्व राजधान्यांतून फिरून आलें आहें,

बाबांच्या आज्ञेनें सर्व तीर्थस्थानांची यात्रा वर पसंत करण्याकरितांच मीं केली आहे, आणि बाबांची परवानगी घेऊनच मेध्यारण्यांतील गौतममुनींच्या अश्विनीकुमार पीठाचें दर्शन सांप्रत मीं घेत आहें. ह्यांत अविचार कोणता ? मेध्यारण्याकडे यावयास मी निघालें त्या वेळींच बाबांना तुम्ही कां सांगितलें नाहीं हा अविचार होतो म्हणून ?

बहु०:—मी एकसारखा सांगत आलों आहें, प्रख्यात राजधानींतला एखादा राजा, राजपुत्र, किंवा मंत्रिपुत्र—मंत्रिपुत्र—हो—हो—मी माझ्या मुलाच्या वतीनें बोलतों आहे असें समजूं नका—पण माझ्या मुलाच्या वतीनें तरी मी कां बोलूं नये—एखादा मंत्रिपुत्र, माझा मुलगा किंवा तत्सदृश—उगीच भाडभीड कशाला—सदृश म्हणजे तोच—एखादा मंत्रिपुत्र पसंत करणें गैरशिस्त नाहीं.—पण अरण्यांतील सेवेकरी आमच्या राजधानींत कोणासच आवडणार नाहीं.—काय सत्यवान, तुम्हाला नाहीं वाटत हा सर्व अविचार होत आहे ?

सत्य०:—ह्या अविचारापासून राजकन्येला मी परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत आहें. [ पडद्यांत—' द्या टाळी बाबा ' ] मजसारखा मेध्यारण्यांतील सेवेकरी अश्वपति महाराजांच्या राजधानींत आवडता कसा होईल ? [ पडद्यांत—' द्या बाबा टाळी. ' ]

बहु०:—पोरा, तुला येथें येऊं नको म्हटलें आणि आलास कशाला—चल, चालता हो येथून—[ पडद्यांत—' जातो ह्यावेळीं, पण द्या बाबा टाळी ' ] सरकारच्या पायापाशीं मी सांगावें असें नाहीं—पण अविचार होत आहे—म्हाताऱ्यानें बोललें पाहिजे—राजपुत्र किंवा मंत्रिपुत्र—राजपुत्र म्हणजे पदच्युत झालेल्या राजाचा कंगाल मुलगा नव्हे—जीवंत राजपुत्र—पूर्वीचा नव्हे—पूर्वीचा म्हणजे मृत—आजचा म्हणजे जीवंत—जीवंत राजपुत्र किंवा जीवंत मंत्रिपुत्र—ह्याशिवाय आमचें समाधान होणार नाहीं—जीवंत राजपुत्र कोणीच पसंत नाहीं तर पसंत करावा जीवंत मंत्रिपुत्र. [ पडद्यांत—' आहे ह्या स्थळीं, द्या बाबा टाळी. ' ]

सुम०:--महामते, आपण जरा दूर जाल तर बरें होईल-बहुबुद्धि, ठल्याहून आपण अधिक बोलत आहां, जरा मला बोलूं द्या-वर कोणचा पसंत करावयाचा हें शिकविण्याकरितां आम्हां दोन मंत्र्यांना दिमतीला ठेवण्यांत आलेलें नाहीं-जरा कोठें धाई होत असल्यास, अश्वपति महाराजांच्या कानावर सर्व कांहीं जाईतों थांबण्याची कृपा व्हावी, एवढीच विनंति करण्याचा आमचा अधिकार आहे.

सावि०:--ही विनंति मेध्यारण्यांत आपल्यापासून मी तिसऱ्यांदा ऐकतें आहे; आणि उद्यां बाबा आल्यावर बाबांच्या देखत आणखी दोन तीन वेळां ऐकण्यास माझी ना नाहीं; पण इकडच्या देखत जें मी ऐकून घेणें अपमानास्पद आहे तें मला कां ऐकवीत आहां ?

सुम०:--पायरी सोडून आम्ही जरा स्पष्ट बोललों, क्षमा करावी; उदईक अश्वपति महाराजांजवळच आपल्या समक्ष विनंति करूं.

बहु०:--सत्यवानाचा अपमान होतो आणि मंत्र्यांचा आणि मंत्रिपुत्राचा अपमान होत नाहीं-राजाचे मंडळाला भलत्यापुढें मस्तक लववायला लावणें म्हणजे आपल्या प्रभेंतील सर्व हिऱ्यामोत्यांना पायाखालीं तुडविणें होय.

सुम०:--नको, नको, जास्ती बोलूं नको; बहुबुद्धि, जास्ती बोलून तुम्ही आपलीच फजिती करून घेत आहां; झांकली मूठ सव्वा लाखाची; अश्वपति महाराजांपुढें उघडी करा, परक्यापुढें नको-चला आतां येथून--

सत्य०:--राजकन्ये, मजमुळें ह्यांच्या अंतःकरणांना फार दुःख होत आहे; मी ह्यांच्याबरोबर दोन पावलें बोलत जातों व थोडें ह्यांच्या मनाचें समाधान करतों; सत्यवान मद्र देशच्या मंत्र्यांच्या तेजोभंगाला कारणीभूत झाला, असें नको व्हावयाला.-आलोंच मी क्षणांत परत.

[ सुमति, बहुबुद्धि व सत्यवान जातात.

सावि०:--हा बहुबुद्धि इकडचा अपमान करतो, त्याच्याच मनाला आपण दुखविलें कीं काय असें ह्यांना वाटतें!-दुसऱ्याला किती किती बरें जपायचें-

स्वत:कडे थोडें नको का पहावयाला ?—मातापितरांच्या सेवेला वाहून घेतल्या-मुळें परपीडेच्या पापाचें भय ह्यांना पावलोपावलीं वाटतें! पृथ्वी पादाक्रांत करण्याची मनगटांत धमक, परोपकाराची स्वयंभू हौस, आणि परपीडेचें पातक लागूं नये म्हणून अहिंसेचें स्वीकारलेलें व्रत—असल्या गुणांचा समुच्चय म्हणजे पृथ्वीवरील स्वर्गच होय.

पद १७, राग—बागेश्री, ताल—त्रिताल; चाल—" आजहुन—आजहुन. "

**आनंदित, आनंदा मिसळत शांत; पूर्ण पूर्णा मिसळतां, कालें भोगतांहि, पूर्ण सदा ॥ ध्रु० ॥ उपमा कसली चंचल स्वर्गा, तेथहि मरणचि भोगा। अमरण—चरणा सत्यवाना रमवावें सुख—कंद—कंदा । १ ।**

हा स्वर्ग मला प्रत्यक्ष दिसावा आणि सुमति किंवा बहुबुद्धि ह्यांना दिसूं नये, असें कां बरें व्हावें ?—मद्र देशची राजलक्ष्मी एखाद्या मंत्रिपुत्राचे पदरांत पडावी असा जर लोभ नसता, तर आमचे मंत्री अंधच झाले नसते आणि मग हे सद्गुण आपोआप दिसले असते.—पृथ्वीभर फिरलें—इतके राजपुत्र व मंत्रिपुत्र पाहिले—सद्गुणांचा उत्कर्ष एका ठिकाणीं तरी दृष्टीस पडला का ?—कोणी गर्विष्ट तर कोणी भित्रा, एक मूर्ख तर दुसरा हावरा,—मद्र देशचें राज्य हुंड्यादाखल हा मागतो तर किती सवतींपुढें दासी म्हणून नाक घासायला राजकन्या तयार आहे म्हणून तो विचारतो—मेध्यारण्याकडे धांव मीं उगीच नाहीं घेतली.—हे पहा परत येत आहेत—ह्यांच्याकडे पाहिलें म्हणजे माझें थोडें तरी कोठें चुकतें आहे, असें मला वाटतच नाहीं.

पद १८, राग—मांडजिल्हा; ताल—रूपक; चाल—" आइरी सजना. "

**लाविना मन हें अजि दोषा या जना ॥ ध्रु० ॥ निकटि आला, शरण गेला मम देह तत्क्षणा ॥ १ ॥**

ह्यांच्याशीं लग्न करण्याचा मीं निश्चय केला आहे; ह्यांत कसला अविचार? ह्या दुसऱ्या बाजूनें कोण येत आहे ?—हा महामती—हो महामतीच—ह्या

सोंगाकडे पाहिल्यावर असल्या मंत्रिपुत्राकडे मी लक्षच दिलें नाहीं, ह्याबद्दल मला कोण दोष देईल ?–दिवटें ध्यान आहे–अगदीं ध्यान आहे !–बरे समोरा समोर दोघेहि येत आहेत; माझें काम आयतेंच झाल्यावांचून राहणार नाहीं.

[ महामती शस्त्रांचा भारा घेऊन येतो. ]

**महा०**:—राजकन्ये, बरें झालें, एकटी सांपडलीस–एकटीला गांठायचा प्रयत्न किती दिवस करीत होतों, आज योग जुळून आला–जुळवाजुळव झाली, द्या बाबा टाळी–भिऊं नकोस–शस्त्रास्त्रांचें हें बाहेरचें नुसतें सोंग आहे, खरी गोष्ट तुझ्यापासून लपवून ठेवीत नाहीं–हा नुसता बागुलबोवा आहे–भिऊं नकोस–सिंहाचें कातडें पांघरलें आहे, मी खरा सिंह नव्हे–भिऊं नकोस आणि हंसूंहि नकोस–आयती एकटी सांपडली आहेस, बोलून घेतों–बाबा अर्धेमुर्धें बोलले, मी पुरतें करतों–बापसे बेटा सवाई–संधि साधली, द्या बाबा टाळी–अरे हा कोण आला–सत्यवान कीं काय–सावित्री, सत्यवान आला–माझी धडगत दिसत नाहीं–माझ्या दोन मुस्कटांत लगावून ह्यानें माझीं हीं सर्व शस्त्रास्त्रें हिसकावून घेतलीं तर–हा आलाच–सावित्री, तूं सांग सत्यवानाला, तपस्वी चोरी करीत नसतात–( सत्यवान येतो ) माझ्यावर सूड उगवायचा असला तर खुशाल उगीव आणि घे हीं शस्त्रास्त्रें माझ्यापासून हिसकावून–टाकूं भारा तुझ्यापुढें सत्यवान ? [ भारा टाकतो.

**सत्य०**:—हे साल्वदेशच्या राजघराण्यांतील धनुष्य-बाण आहेत; द्युमत्सेन महाराजांची राजमुद्रा ह्या प्रत्येक शस्त्रावर आहे; तुम्हांला हीं कोठून मिळालीं ?

**महा०**:—पटली खूण, राजकन्ये, पटली खूण !–ज्यानें द्युमत्सेनाला आंधळा करून ह्या जंगलात हांकून दिलें, साल्वदेशच्या सांप्रतच्या त्या राजानें मला आपला मुख्य मंत्री केला आहे–पटली खूण, सत्यवान, पटली खूण !–मुख्य मंत्री नेमल्याचें पत्र सुमतिकाकांनीं व बाबांनीं फाडून टाकलें, पण चोरीचा माल सत्यवानानें ओळखल्यामुळें–हा मुद्देमाल सांगत आहे, मी साल्वदेशाचा मुख्य मंत्री आहें–आणि माझ्या राजाची अशी आज्ञा आहे–जर राजकन्येनें

सत्यवानाशीं लग्न केलें तर साल्वदेशचीं सर्व शस्त्रास्त्रें मेध्यारण्यावर स्वारी करतील आणि सत्यवानाला यमपुरीचा रस्ता दाखवितील.–राजकन्ये तुला जर सत्यवानाचें हित करावयाचें असेल तर ह्याच्याशीं लग्न करूं नकोस–लग्न केलेंस कीं घेतलाच ह्या बाणांनीं सत्यवानाच्या नरडीचा घोट !

सत्य०:—आमचें राज्य कपटानें चोरून घेणारा तो भामटया जर मेध्यारण्यावर चाल करून आला तर ईश्वरानें माझें गाऱ्हाणें आयतें ऐकलें असें होईल; बाबांच्या डोळयांना गुण येण्यास अद्याप एक वर्षाचा अवधि आहे आणि तोंपर्यंत बाबांच्या सेवेला मुकल्याशिवाय रणांगणावर शत्रूची गांठ मला घेतां येत नाहीं, पण आमची तपश्चर्येची जागाच जर शत्रूनें रणभूमि केली तर आईबापांच्या रोजच्या सेवेला न अंतरतां मेध्यारण्यांतच मी साल्वदेशचें राज्य परत मिळवीन, इतकें ह्या धनुष्यांत सामर्थ्य आहे.

पद १९, राग–सुग्राही कानडा; ताल–एकताल; चाल–" अततन देरेना."

**रिपु जरि समरा ध्यावया आजि आला। मिळविल मम बाहु सबल धूळीं तयाला ॥ध्रृ०॥ धर्मकर्मा विपरित ना रण मजला। रण वनांत येतां, तप दावी महाबला ॥ १ ॥**

राजकन्ये, माझ्या बाबांच्या गादीवर कपटानें बसणारा तो चोर मेध्यारण्यावर हल्ला करील म्हणून भिण्याचें कोणालाच कारण नाहीं.

महा०:—मग हे बाण, हीं धनुष्यें, ह्या गदा, सर्व चोरीचाच माल म्हणावयाचा ?–मालकाच्या हवालीं हा माल मीं केला आहे, जाऊं मी आतां निर्धास्तपणें–घ्या आपला माल बरोबर मोजून–मागाहून तक्रार चालणार नाहीं–( पद्यांत–' चल, पोरा लवकर उचल पाय ' ) आलों बाबा, सत्यवानाच्या पदरांत चोरीचें माप टाकतों आणि हा आलोंच–आहे बरोबर !–नाहीं तर चोराला सोडून मजसारख्या संन्याशाला फाशीं देण्यांत यावयाचें–सत्यवान, तुला जातां जातां बजावतों माझ्या हातून सुटलेली ही मासोळी म्हणजे सुळावरची पोळी, असें पक्कें समज. ( पद्यांत–' चल पोरा लवकर ' ) हा आलोंच–घे तुला सुळावरची पोळी, घ्या बाबा टाळी. [ जातो.

सावि०:—आचरटपणाबरोबर दुष्टपणाहि ह्या महामतीचे अंगांत भरला आहे; हीं शस्त्रास्त्रें ह्यानें गोळा केलीं; पण आचरटपणानें ह्याला तोंडघशीं पाडलें! आपलें मोठें मन ह्याच्या वाटेस जाणार नाहीं हें खरें, पण महामती किंवा बहुबुद्धि ह्यांच्या बरळण्याकडे लक्ष देऊन, त्यांच्या मनाला वाईट वाटण्यास आपण कारणीभूत झालों म्हणून इकडून दुःखी होण्याचें काय कारण?—महामती किंवा बहुबुद्धि यांच्याकडे लक्षच पुरवूं नये म्हणजे झालें.

सत्य०:—सुमति मंत्र्याचे जागीं मी जर असतों आणि तुझ्या लग्नासंबंधानें मत देण्याची पाळी आली असती तर सत्यवानाच्या आजच्या स्थितींत त्याला जांवई करा असें अश्वपति महाराजांना मीं कधींहि सांगितलें नसतें.—सुमतीच्या तक्रारीचा गौरव करणेंच उचित होय आणि तसा मीं आतां केलाहि आहे.

सावि०:—आपण सर्वांचाच कैवार घेतां व सर्वांचीच काळजी वाहतां, मजकडे मात्र लक्ष पुरवायचें होत नाहीं. मेध्यारण्यांत राहून आपल्या मर्जी-प्रमाणें आपली सेवा करण्यांत मला स्वर्गसुख वाटतें; आपल्या सहवासापुढें आईबापांच्या राजलक्ष्मीची मला कांहीं किंमत नाहीं; हें वन हीच माझी राजधानी, माझा राजा येथें राहतो; वटवृक्ष हाच माझा पिता, व वनश्री हीच माझी आई, ह्यांच्या आशीर्वादानें आपण सुखी आहां; माझे बाबा मद्रदेशचे राजे आहेत हें मी कधीं मनांतच आणणार नाहीं; मद्रदेशाच्या मदतीशिवाय साल्व देशचें सिंहासन परत मिळविण्याची शक्ति इकडच्या अंगीं भरपूर आहे हें मला माहीत आहे; आपलें व्रत संपेतों व आपणास तशी इच्छा होईतों राज्य परत मिळविण्याचा उद्योग करा असा आग्रह माझ्या माहेरच्यांपैकीं कोणी कोणी आपणास करणार नाहीं. आपल्या सद्‌गुणावरून राजलक्ष्मी ओवाळून टाकावी एवढा मोठा पुण्याचा संचय आपल्या पदरीं आहे; त्याच पदरांत मला घ्या व पवित्र करा, अशी आपल्या ह्या दासीची आपल्या पायापाशीं विनंति आहे.

पद २०, राग जंगला; ताल–कवाली; चाल–" बिनति हमारी."

**मजला घडावी देवा तव पदसेवा। सहवास द्यावा ॥ ध्रु० ॥**
**सेवेंत भाग पावतां, सहजा मिळे समता। छंद असा पुरवावा ॥ १ ॥**

**सत्य०:**—सावित्री, तूं ज्याला वरशील त्यालाच तुला देऊन टाकण्याचें वचन तुझ्या आईबापांनीं तुला दिलें आहे; तेव्हां तूं आपला निश्चय अशा रीतीनें बोलून दाखविणें हें तुझ्या प्रेमाला शोभतें–पण माझ्या आईबापांनीं–

**सावि०:**—सासूबाई नको म्हणणार नाहींत अशी माझी खात्री आहे.

**सत्य०:**—नको म्हणणार नाहींत हें खरें, पण अद्याप होयहि म्हणाली नाहीं.–शिवाय मी होऊन लग्नाची गोष्ट आईजवळ बिलकूल काढणार नाहीं, माझी सेवेकऱ्याची सांप्रतची वृत्ति मला तसें करूं देत नाहीं.

**सावि०:**—आपण गोष्ट काढावी, असें माझें म्हणणेंहि नाहीं. उद्यां माझे आईबाप येथें येतील; त्यांच्या कानावर सर्व–सर्व–मजकूर मी घालीन—

**सत्य०:**—मंत्र्यांचें व मंत्रिपुत्राचें म्हणणें सविस्तर अश्वपति महाराजांना समजलें पाहिजे—

**सावि०:**—त्याची काळजी नको करायला–सुमति, बहुबुद्धि व महामति ह्या सर्वांच्या वतीचा पाढा मी बाबांच्यापुढें वाचीन, साल्व देशचें राज्य जिंकून हुंडा म्हणून अर्पण करण्याची गोष्टच बोलूं नका, असें बाबांच्या मनांत मी पुरें बिंबवीन—

**सत्य०:**—ओशाळगतीचें राज्य माझ्या बाबांना नको, आईला नको आणि मलाहि नको—

**सावि०:**—महेरचें राज्य मलाहि नको.–ह्या सर्व गोष्टी कबूल करून बाबांनीं जर द्युमत्सेन महाराजांपाशीं लग्नाची गोष्ट काढली—

**सत्य०:**—माझ्या आईबापांनीं रुकार दिला तर माझी हरकत नाहीं; पण

आईनें किंवा बाबांनीं जरा जर आढेवेढे घेतले तर मी कांहीं लग्नाची गोष्ट यत्किंचितहि पुढें ढकलणार नाहीं. तुझें जितकें प्रेम मजवर आहे तितकेंच तुझ्यावर माझें प्रेम आहे; पण सांप्रतच्या सेवेंत आईबापांच्या मनाविरुद्ध थोडेंदेखील जावयाचें नाहीं असें व्रत मीं आनंदानें स्वीकारलें असल्यामुळें तुझ्या प्रेमाचा तसा हिरमोड व्हावयाची वेळ आल्यास माझ्या हातून कांहीं मदत व्हावयाची नाहीं; हें पक्कें समजून आपल्या आईबापांपाशीं जें काय बोलायचें असेल तें बोल. तूं तुझ्या तर्फेनें आज वाङ्निश्चय जसा केला आहेस तसा माझ्या तर्फेनें वाङ्निश्चय करण्यास मी आज तयार नाहीं. [ जातो.

**सावि०:**—वाङ्निश्चय आपण करा किंवा न करा, ह्या पायाचा आश्रय सोडून ह्या क्षणापासून मी कोठेंहि जाणार नाहीं.—माझें प्रेम सत्य आहे, आपण, सासूबाई किंवा मामंजी मला कधींहि दूर लोटणार नाहींत; चंद्र अग्नीचा वर्षाव करील, अमृत विषाप्रमाणें प्राणघातक होईल, तर आपण व आपले नातलग ह्या दासीला अंतर देतील.

पद, २१ राग तिलककामोद; ताल झपताल; चाल—"हरिहर भेदना."

**प्रेमळा लोटिता कांता दूर। प्रेमाचि घडवील मग ती ऐक्यता ॥ धृ० ॥ निज भक्त देवा, निज देव भक्ता। जोडितां जगतीं संतुष्टता ॥ १ ॥** [ पडदा.

——

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळ—बहुबुद्धीचें शिबीर—बहुबुद्धि व सुमति प्रवेश करितात. ]

सुम०:—बहुबुद्धि, तुमचें आजकाल फारच चुकत चाललें आहे; मी प्रथम महाराजांच्या दर्शनाला जातों, आणि मागाहून तुम्ही या; रागरंग मी पाहून घेतों मग त्या मानानें तुम्ही बोला म्हणजे झालें.

बहु०:—मला सावित्रीचीच भीति वाटते; राजकन्या बोलण्यांत पटाईत, मला तेव्हांच नडविते; महाराजांना नाहीं मी भीत, खेळीमेळींतले आहेत; अचरट, अचरट, म्हणून पुष्कळ वेळां म्हटलें आहे, आज आणखी एकदां म्हणतील इतकेंच.—पण प्रवासाचे श्रम, तेव्हां तोंडाला तुम्हीच असावें हें बरें.—मालवी महाराणीचीहि भेट प्रथम तुम्ही घ्या, सावित्रीचें म्हणणें संपून राग शांत झाल्यावर मी जाईन महाराणीचे दर्शनाला—हें सर्व ठीक जुळलें—पण, पण, महाराज व महाराणी यांजबरोबर नारदमुनी आले आहेत, त्यांची वाट काय ?—आम्हां दोघांपैकीं प्रथम कोणी त्यांच्या तोंडास तोंड द्यावयाचें ?

[ महामती ' नारद नारद ' असें भजन करीत येतो.

महा० —मी देतों नारदाच्या तोंडास तोंड—असा मृदंग बडवीत, टाळ आपटीत, नामाची फोडतों किंकाळीं, द्या बाबा टाळी.

सुम०:—महामते, हें आज कसलें सोंग आणलें आहे ?

महा०:—सोंग ?—सोंग बिंग कांहीं नाहीं बरें—नक्कल नव्हे, अस्सल आहे—काका, मी हरिभक्त झालों आहें; नारद आले आहेत, मी हरिभक्त झालों आहें. सत्यवान आणि मी, दोघांत हरिभक्त मी ठरणार; आणि नारदमुनि सावित्रीला सांगणार हरि भक्त महामतीच्याच गळ्यांत माळ घाल—ही टाळ वर माळ; भक्तीची झोळी, द्या बाबा टाळी. [ चित्राश्व येतो.

सुम०:—ह्या चित्राश्वाला आणि महामतीला येथें बोलत बसूं द्या; आपण दोघे अश्वपति महाराजांच्या दर्शनाला जाऊं आणि तेथेंच ठरवूं नारदमुनींशीं कसें बोलायचें तें.

बहु०:—मला थोडें ह्या चित्राश्वाशीं बोलावयाचें आहे; आपण पुढें व्हा, मी आलोंच मागोमाग; आपण जसें सांगाल तसें मी बोलेन, आपल्या बाहेर मी बिलकूल नाहीं. [ सुमति जातो.

चित्रा०:—दोघांचेंहि आयतें दर्शन झालें.—द्युमत्सेन महाराज व शैब्या महाराणी यांनीं मला आज्ञा केली कीं, अश्वपति महाराज व माळवी महाराणी ह्यांच्या स्वाऱ्या मेध्यारण्यांत येऊन पोहोंचल्या किंवा कसें ह्यासंबंधाची सर्व हकीकत आम्हाला येऊन सांग.

महा०:—आतां माहिती विचारावयाला आलां ? व्याही होणार तुम्ही आमच्या महाराजांचे आणि महाराज येथें येऊन दाखल झाल्यास आतां चार घटका होऊन गेल्यावर बातमी काढावीसें मनांत आलें ! चार घटका झाल्या चार घटका अश्वपति महाराज येऊन; बरोबर नारदमुनींचीहि स्वारी आहे !

चित्रा०:—नारद मुनी आले आहेत !—सावित्री राजकन्येच्या विवाहाचा विचार करायला अश्वपति महाराज आले, हें ठीक आहे; पण नारद मुनी बरोबर कशाला ?

बहु :—जेथें नारद जातात, तेथें तंटेबखेडे सुरू होतात,—लोक असें म्हणतात हो—मी नाहीं म्हणत—

महा०:—मी देखील नाहीं म्हणत; पण नारद आले म्हणजे विघ्न आलें म्हणून समजावें—चित्राश्व, मला हें लक्षण बरोबर दिसत नाहीं—मी आतां तुमच्या विरुद्ध नाहीं, मी लग्नावर बिब्बा घालणार होतों, आतां नारद मुनी घालणार, मग मी कशाला होऊं सत्यवानाचा वैरी ?—नारद म्हणजे विघ्न लग्नाचे वेळीं, द्या बाबा टाळी.

बहु०:—हें सर्व खरें आहे, मुला; पण आपण असें बोलूं नये मोठयांदां—फट म्हणतां ब्रह्महत्या व्हावयाची—

**महा०:**—मी बोललों तरी हरकत नाहीं बाबा,—माझ्या वेषाकडे पहा—नारदासारखा हुबेहूब हरिभक्त झालों आहे—भक्तांच्या टोळींतला झाल्यावर नारदाच्या भोपळ्यावर टाळ मारली तरी हरकत नाहीं—वेष बरोबर साधला पाहिजे. मला पाहिल्यावर नारदानें माझें सोंग आणलें आहे, असेंच सर्व म्हणतील.—चित्राश्व मीं तुम्हाला आश्वपति आले, मालवी महाराणी आली, नारद आले, सर्व बातमी सांगितली, तुम्ही मला एक बातमी खरी खरी सांगा.

**चित्रा०:**—आपण विचारल्यावर मी सांगणार नाहीं असें काय आहे ?

**महा०:**—बाबा, तुम्ही तरी सांगा नाहीं तर ह्या चित्राश्वाला सांगूं दे,—नारदाच्या एकतारीला पांच तारा असतात, का तीन तारा असतात, का मुळींच नसतात ? स्वर्गीय वीणा बिनतारांनींच वाजवावयाची—माझी एकतारी बिनतारांची आहे—

**बहु०:**—नारदाच्या विण्याला तारा नसतात, अशी माझी समजूत आहे—पुष्कळ तारा लावून जोडाजोडी कोण करणार ?

**महा०:**—कळीचा नारद—तंटा लावून दिल्यावर जोडाजोडी व्हावयाची—म्हणून मी म्हणतों बाबा नारदाच्या एकतारीला पुष्कळ तारा असल्या पाहिजेत—

**बहु०:**—असल्या पाहिजेत म्हणजे ? नारदाच्या एकतारीला मुळींच तारा नसल्या पाहिजेत—एकच तार म्हणजे शुद्ध कंगालपणा, आणि तारावर तारा म्हणजे जोडाजोडीचा माग—भोपळ्याला ताराच उपयोगी नाहींत, मी तर माझ्या एकतारीला तारेचा स्पर्शहि होऊं द्यावयाचा नाहीं—नारदाच्या एकतारीला तारा नसतात मुला—मुला, नसतात तारा—

**महा०:**—असतात तारा बाबा, बाबा तारा असतात बरें—

**बहु०:**—नसतात, नसतात; असल्या तर मी त्या तारा काढून टाकीन—नसतात नसतात—

**महा०:**—असतात—नसल्या तर ह्या अशा नव्या लावीन—असतात—म्हणे नसतात ! ह्या तारांनीं तुमचें तोंड शिवून बंद करीन तुमची टकळी, द्या बाबा टाळी.

[ पडद्यांत:—अश्वपति महाराजांच्या अंबारीचा हत्ती अकस्मात विथरून ह्या शिबिराचा नाश करीत आहे; बहुबुद्धि सावध असा, महामती, सावध रहा सावध. ]

**बहु०:**—मुला, मुला, नारदाचें हें सोंग दे टाकून आतां, साधूंची थट्टा अशी केल्यानें हा अनर्थ कोसळला आहे; चल, पळ, ह्या वाटेनें पळ, नाहीं तर हत्तीच्या पायांखालीं सांपडून मरशील—

[ पडद्यांत:—पूर्वोक्त; व " धूम ठोका, पळा नाहीं तर मराल, पळा. " ]

**महा०:**—बाबा, बाबा, हत्तीनें मला पकडलें आहे, हत्तीनें सोंडेंत मला धरलें आहे, पायाखालीं मी तुडविला जाणार—मला सोडा, मला सोडा, तुम्हीहि हत्तीच्या पायाखालीं सांपडून मराल—सोडा मला—हत्तीनें मला धरलें, सोडा मला—

**बहु०:**—अरे पोरा, मला हत्तीनें धरलें—माझ्यापुढें ह्या वाटेनें पळ—नाहीं तर तुझ्या अंगावर हत्ती पाय देईल—पळ ह्या रस्त्यानें—मला हत्तीनें धरलें.—

**महा०:**—मला हत्तीनें धरलें—त्या वाटेनें बाबा तुम्ही पळा—मरायची पळापळी, ह्या बाबा टाळी. [ वरीलप्रमाणें ओरडत एकमेकांस ओढीत जातात. ]

**चित्रा०:**—हें काय पाहतों आहें मी ! खरोखरच हे पितापुत्र—बहुबुद्धि आणि महामती हत्तीच्या पायाखालीं आपण होऊन पडत आहेत—सांपडले पायाखालीं— शाबास सत्यवान, शाबास सत्यवान, पाहूं सत्यवानाचा हा पराक्रम तर पाहूं. [ जातो.

---

## प्रवेश दुसरा.



[ *स्थळ*—बहुबुद्धीच्या शिबिराजवळची जागा—हत्तीच्या पायाखालीं बहुबुद्धि व महामती चुरडले जाणार इतक्यांत हत्तीच्या सोंडेवर परशूचा घाव करून हत्तीला सत्यवान मागें हटवितो व दोघांना सोडवितो, असा देखावा. ]

**सत्य०:**—जा, आपल्या शिबिरांत जाऊन निर्धास्त बसा, जा; हा मस्तींत

आलेला हत्ती माझ्या परशूची आठवण असेतों तुमच्या शिबिराकडे केव्हांहि वळावयाचा नाहीं.—बहुबुद्धि, आतां भिण्याचें कारण नाहीं, संकट चार पावलें मागें हटलें आहे! महामती, हत्तीच्या पायाखालीं आपण सांपडला होतां तरी 'नारद, नारद' असें आपण म्हणत होतां,—साधूंच्या नामाचा महिमा असा आहे कीं मृत्यूचें हे त्या नामापुढें कांहीं चालत नाहीं—नारद मुनींच्या नुसत्या नांवानें ह्या संकटांतून सोडविलें आहे—जा, आतां तुम्हांला कोणत्याहि प्रकारचें भय उरलें नाहीं—सत्समागमानें तुम्हाला मृत्यूच्या मुखांतून सोडविलें आहे.

बहु०:—मुला, आपण खरोखरच हत्तीच्या पायाखालून सुटलों कारे—हत्ती दूर गेलाना—जवळ असेतों मी डोळे उघडणार नाहीं.

महा०:—गेला, हत्ती दूर गेला बाबा—पण केव्हां आम्हाला पुन्हा सोंडेनें धरून पायाखालीं ठेंचील, नेम नाहीं—बाबा, बाबा, हत्तीच्या सोंडेंत सांपडलों—पुन्हा सांपडलों—पकडलें मला—

बहु०:—मुला, मीहि सांपडलों—सांपडलों, पुरता सांपडलों—मुला, 'नारद—नारद' नको म्हणूं—बापलेकांतच तंटा उत्पन्न होईल, मग आम्हाला कोणी सोडविणार नाहीं—सत्यवाना, धांवरे धांव, आम्हाला हत्तीनें पायाखालीं चिरडलें—

महा०:—सत्यवाना. धांवरे धांव—हत्ती निघून गेला तरी हत्तीच्या पायाखालीं सांपडून मरत आहों—धांवरे धांव, सत्यवाना आम्हाला सोडीव.

सत्य०:—बहुबुद्धि, नीट डोळे उघडून पहा—उघडा डोळे, हत्ती गेला—भीति उरली नाही—उघडा डोळे—

बहु०:—(डोळे उघडून) मुला, खरेंच हत्ती गेला—

महा०:—बाबा, खरेंच हत्ती गेला—आतां पळा येथून, नाहीं तर येईल हत्ती फिरून.—पळा बाबा पळा—हत्तीला पाहून माझी बोबडी वळली, ह्या बाबा टाळी.

[ बहुबुद्धीला घेऊन जातो.

सत्य०:—अद्याप ह्यांच्या मनांतील भीति दूर झाली नाहीं. प्रत्यक्ष मृत्यूनेंच ह्यांना गांठलें होतें, असें गांगरून जाणें साहजिक आहे. नारद मुनी आले असतांना मेध्यारण्यांत मृत्यूनें असा गोंधळ माजवावा–बरोबर नाहीं–सत्पुरुषाची सेवा असला मृत्यु दूर लोटून मला करतां आली, हें मी माझें भाग्यच समजतों–नारद मुनींचा लौकिक कमी झाला असता–सत्पुरुषाच्या प्रेरणेमुळेंच चटदिशीं मी हत्तीला गांठलें, आणि ही माझ्या परशूची परीक्षा भगवद्भक्तांनीं घेतली, ह्याहून अधिक आनंद माझ्या आईबापांना कशानें होणार आहे?–नारद मुनी येणार म्हणून जेव्हां ऐकलें तेव्हां त्यांचें प्रत्यक्ष दर्शन घेऊन कांहीं तरी येथें त्यांची सेवा करावी असें मनांत फार आलें, पण आई नको म्हणाली.–सावित्रीच्या लग्नासंबंधानें वशिला बांधल्यासारखें होईल व तसें करणें पडतां काळांत मानहानीचें होय, असें आईच्या मनांत आलें असावें!–प्रत्यक्ष जरी नाहीं तरी अप्रत्यक्ष सेवा भगवद्भक्तांची माझ्या हातून झाली, आईच्या मनाला माझ्याप्रमाणेंच समाधान झाल्यावांचून राहणार नाहीं.

[ पडद्यांत–ॐ नमो भगवते वासुदेवाय–ॐ नमो भगवते वासुदेवाय—]

पद २२, राग वसंत. ताल–त्रिवट. चाल–"पट भिजली."

**सुखकर हा आवाज भजनाचा । कानीं येतां, नारद दिसतां,**
**डोलत कानन स्वर्गचि साचा ॥ धृ० ॥ विचार सार उसळत**
**फार; वर्णन-कीर्तन सुखवी वाचा ॥ १ ॥**

हे नारद मुनीच ह्या बाजूनें येत आहेत–आईची आज्ञा–सत्पुरुषाच्या पायावर ह्यावेळीं मस्तक ठेवतां येत नाहीं–बहुबुद्धीच्या शिबिरांत जाऊन भ्यालेल्या मनाला थोडा धीर देणें आतां उचित आहे. [ जातो.

[ नारद, अश्वपति, मालवी व सुमति येतात. ]

सुम०:—हाच हाच तो सत्यवान. ह्यानेंच परशूच्या घावानें हत्तीला मागें रेटलें—

**अश्व०:**—मोठमोठया मल्लांच्या हातांतील भाल्यांच्या माऱ्यामुळें जो हत्ती केसभरहि मागें हटावयाचा नाहीं–शरीर सामर्थ्यासंबंधाचा मद्र देशचा नक्षाच मेध्यारण्यानें उतरविला म्हणावयाचा—

**माल०:**—सुमति, बहुबुद्धीला सांगा सत्यवानाला बरोबर घेऊन महामुनींचे दर्शनाला येथेंच आताच्या आतां या, अशी इकडची इच्छा आहे म्हणून—

**अश्व०:**—सत्यवानाला जवळ बोलावून पहाण्याची महाराणीची फार इच्छा आहे, मीहि ह्या कामीं उतावीळ झालों आहें, नारद मुनींची आज्ञा होईल तर सुमति आपण—

**नारद०:**—बहुबुद्धीला व सत्यवानाला अश्वपति महाराजांचें दर्शन घ्यावयाला अवश्य बोलवा–हत्तीची मस्ती उतरली; अश्वपति महाराज, आपल्या सेवकांच्या कबजांत आतां हत्ती आला; अशुभ काळ बरा टळला.–सत्यवानाचे पदरांत मोठेंच यश पडलें, नाहीं महाराज?–सुमति, जा सत्यवानाला घेऊन या. [ सुमति जातो. ] महाराज, तुम्हाआम्हाला टाळून बहुबुद्धीच्या शिबिरांत सत्यवान गेला–विनयामुळें त्यानें असें केलें–स्वतःच्या पराक्रमाचें संकीर्तन होण्याची संधि आपोआप चालून आली असतांहि स्वतःच्या लौकिकांतून निसटून गेल्यासारखें त्या संधीला बगलेला सारणें, हें झालें तरी साधूचें लक्षण समजलें जातें. वीरांच्या पराक्रमाबरोबर साधूंचीं लक्षणें दिसणें म्हणजे नरनारायणांचें एकवटलेलें दर्शनच होणें होय! सत्यवान वीर आहे, साधु आहे, आणि कट्टा तपस्वी आहे. अश्वपति महाराज, सत्यवानाला माझ्या मनांतून एकदां डोळ्यांनीं पहावयाचें होतें; तुम्हां दोघांना ह्या वेळीं जसा तो पराक्रमाच्या भरामध्यें दृष्टीस पडला तसा मलाहि पहावयास मिळाला; दोन शब्द त्याच्याशीं बोलण्यास आज कदाचित् सवड व्हावयाची नाहीं, आतां आला तर बरें–नाहीं आला— [ सुमति व बहुबुद्धि येतात.

**सुम०:**—हे बहुबुद्धि आले–ह्या दर्शनाचा अलभ्य लाभ आज आहे बहुबुद्धि–( बहुबुद्धि दर्शन घेतो. ) मी जाऊन पोहोंचतो तों इतक्यांत सत्यवान स्वतःचे आश्रमाकडे निघून गेले.

**बहु०:**—आईबापांच्या सेवेंत अंतर पडेल, ह्या भीतीनें ते आमच्या शिबिरांत फार वेळ उभे राहिले नाहींत. आम्ही निर्भय झालों असें पाहतांच त्यांना आईबापांच्या सेवेची आठवण झाली आणि ह्त्तीमुळें सेवेंत झालेल्या दिरंगाईची भरपाई करण्याकरितां ते तातडीनें निघून गेले—

**सुम०:**—ह्या दर्शनाच्या लाभाची गोष्ट बहुबुद्धींनीं काढिली; पण आई-बापांची आज्ञा झाल्याशिवाय परमेश्वराच्याहि चरणांच्या दर्शनाचा लाभ एकट्यापुरता मनांत धरणें चांगलें नाहीं, असें उत्तर सत्यवानांनीं दिलें—

**बहु०:**—हीं नादिष्ट माणसें असतात—कोणाला बायकोची सेवा तर कोणाला आईबापांची सेवा—बाहेरच्या नादापैकीच हा एक नाद आहे—देवदर्शनाचा छंद तो खरा छंद, भवबंध सुटण्यास आईबापांची सेवा काय उपयोगी !

**नारद०:**—आईबाप हीं प्रत्यक्ष दैवतें आहेत, त्यांची सेवा हा सत्यवानाचा प्रत्यक्ष धर्म आहे, परमेश्वराच्या मानवी अवताराच्या भक्तीइतकी किंबहुना अधिक किंमत घरांतल्या ह्या मूर्तिमंत, सजीव, व सुलभ धर्माला दिली पाहिजे. ह्या धर्माचें एकनिष्ठेचें आचरण पाहण्याकरितां भगवान पृथ्वीतलावर येत असतात आणि अंगणांत विटेवर उभे राहून असल्या भक्ताचें कौतुक करीत असतात.

पद २३, राग काफी; ताल—त्रिवट; चाल—" लागि उचट. "

**सनातन नाद हा भगवाना। साधुजना पहावें, फुलवित दानत आचरित ज्ञाना ॥ ध्रु० ॥ नाद-निनादें नारदा वदे। शील घे विषय गाना ॥ १ ॥**

**माल०:**—मग सावित्रीनें योग्य वर शोधून काढला, असेंच वाटलें ना महामुनींना !

**नारद०:**—हां, योग्य तर खराच, पण—पण—फारच जड पण आहे—

**बहु०:**—आम्हांला मृत्यूच्या दाढेंतून बाहेर काढलें सत्यवानानें, तेव्हां त्याच्या विरुद्ध बोलणें आम्ही चांगलें नाहीं. तथापि मी असें म्हणतों मनुष्याला मृत्यु पत्करतो, पण दारिद्र्याची जन्माची गांठ कोणीहि पसंत करणार नाहीं.

नारद०:—आम्हां भगवद्भक्तांना दारिद्र्याचा कंटाळा मुळींच नाहीं; खरी भक्ति दारिद्र्यांत चांगली पोसली जाते—अश्वपति महाराज, आईबापांच्या सेवेच्या प्रत्यक्ष धर्माचें महत्त्व मी किती वर्णन करूं? स्त्रियांना ज्याप्रमाणें पति हें प्रत्यक्ष दैवत आहे, त्याप्रमाणें पुरुषांना आईबापांची सेवा हा प्रथम धर्म आहे—हे धर्म अनन्यभक्तीनें पाळणाराचे अंगीं ज्ञानी पुरुषांना देखील थक्क करण्याचें व जडांना विजेचा धक्का बसल्यासारखें सचेतन करण्याचें सामर्थ्य असतें.

पद २४, राग—दुर्गा; ताल त्रिवट; चाल—" एहो रंगभर. "

**माना विशेष या योगा। वपु मन बुद्धि सरळ सकलहि जीव धरि, सुखासि बहु मग जागा ॥ ध्रु० ॥ प्रत्यक्ष दिसला दावित सकला बोलत चालत विभूति—रंगा ॥ १**

अश्वपति महाराज, सत्यवानाचा हा प्रत्यक्ष धर्म व सावित्रीचे सद्गुण मनांत आणून दोघांच्या लग्नाचा विचार करण्याकरितां आपण यावयाचे वेळींच मी मेध्यारण्यांत आलों; पण—मी पण-पण म्हणतो, ह्याचें कारण आहे तें अगदीं निराळें आहे. अश्वपति महाराज, सत्यवानाला डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहण्याचें माझें काम झालें आहे; लग्नासंबंधानें माझा किंतु कोठें आहे, हें आपणाला, महाराणीला व प्रत्यक्ष सावित्रीला सांगून मी माझ्या नित्य भ्रमणांतील इतर कार्याला लागणार आहें.—चला शिबिराकडे. [ सर्व जातात.

---

## प्रवेश तिसरा.

---

[ स्थळ—अश्वपतीचें शिबिर—सावित्री प्रवेश करिते ]

सावि०:—आईनें, बाबांनीं, सर्वांनीं मेध्यारण्यांत यावें आणि तिकडचें दर्शन एकदां सर्वांनीं घ्यावें, माझ्या मनांत फार होतें; मनासारखें घडून आलें! नारदमुनींनींहि पहावयाचें उरलें नाहीं.—सर्वांना कसें पण दर्शन झालें! सामर्थ्याच्या व ऐश्वर्याच्या भर ज्वानींत सार्वभौम राजा चतुरंग सेनेच्या अग्रभागीं

शत्रूशीं लढतांना जशी शोभतो तशी शोभा मदोन्मत्त हत्तीला मागें हटविण्याऱ्या त्या दिव्य-मूर्तीला पाहतांना सर्वांच्या दृष्टीस पडली.

पद २५, राग—झिंझोटी; ताल—कवाली; चाल—" सिरि राम कहे. "

सजला नटला जणु राजा। लखलखीत दावित तेजा ॥ ध्रु० ॥
बलसागर तारी दीना। तप तपत शीलधर राणा। बहु चमकवि साहस काजा ॥ १ ॥

आई खूप झाली, बाबा खूप झाले, पाहिल्यावर सर्व खूप व्हावयाचेच.—डोळ्यांत तेजच आहे तसें; पाहिलें कीं जिंकलें म्हणून समजावें.—बोलणें अद्याप कोणी ऐकलें नाहीं; ऐकलें कीं झालेच सर्व माझ्यासारखे वेडे—वेड लावणारी मूर्ति आहे खरें वेड लावणारी—आणि सद्गुण तर कसे आहेत, नारदांनाहि आनंद झाला ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं.—आनंदस्वरूप परमेश्वर आहे म्हणून म्हणतात; खडतर तपश्चर्येंत आईबापांची सेवा करितांना सदा आनंदी दिसणाऱ्या त्या मूर्तीला पाहिल्यावर, परमेश्वराच्या चरणापर्यंत मनुष्याला नेऊन पोंचविणारे सद्गुण आनंदाची खाणच आहेत, हें तेव्हांच बुद्धीला पटतें; आणि आनंद आनंदाकडे वहात असतो हें ध्यानीं येऊन, परमेश्वराच्या आनंदमय स्वरूपाविषयीं शंकाच शिल्लक रहात नाहीं.—आनंदी आहेत, वैर कोणाशीं नाहीं, आणि आपल्यासारखें दुसऱ्याशीं वागण्यांत फार कुशल व तत्पर आहेत! असला योग नारदमुनींना तरी वारंवार कोठून पहावयास मिळणार?—नारदमुनी तिकडच्या विरुद्ध ब्रहि बोलणार नाहींत.

पद २६, राग मालकंस; ताल त्रिवट; चाल—" नहि आवुंगी "

मुनि प्रकटला, सुखवी मला। सुख—कंद ना दे दुःखाला ॥ ध्रु० ॥
उद्धारि साधु बहु साधकांना। संसार परि ना उच्छेदिला ॥ १ ॥

आईनें हो म्हटल्यासारखेंच आहे; बाबा आईच्या म्हणण्याबाहेर जाणार नाहींत; भगवद्भक्तांना नारद मुनी दूर कसे लोटतील?—अरण्यांत रहाणारे, राज्याला मुकलेले आणि ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडलेले म्हणून जर असल्या

सद्गुणांना नारद मुनींनीं कमी दर्जाचें ठरविलें, तर भागवत धर्माचे प्रवर्तक ही नारदांची कीर्ति व्यर्थ ठरणार नाहीं काय ? [ मालवी व गायत्री येतात.

**माल०:**—मुली, आतां इतक्यांत नारद मुनींना बरोबर घेऊन तिकडचें येणें होईल– मी जरा पुढें आलें–गायत्रीनें तुझें मनोगत सगळें मला सांगितलें आहे–सगळयांना सर्व कांहीं समजलें आहे–पण हें बघ–पण—

**सावि०:**—पण–पण–काय ग आई ?–आई, माझें मनोगत तुला समजलें आहे ना ? मग पण, पण, काय ? आई, तूं अशी काय बघतेस माझ्याकडे ? पण बिण नकोग आई कांहीं म्हणूं–माझ्या मनोगताप्रमाणें बाबा वागणारना ?–होय म्हण ना आई चटदिशीं–म्हणना होय ? आई–आई–असेंच लाडिकपणानें मजकडे पहा आणि चटदिशीं होय म्हण.

**गाय०:**—आई कोठें विरुद्ध आहेत, सावित्री,–हें बघ बहुबुद्धींना व महामतींना हत्तीच्या मरणांतून सोडवितांना आईनीं पाहिलें आहे, आईच्या मनाचा निश्चय झाला आहे जावई असावा तर असा असावा—

**सावि०:**—मग होय म्हणेनास चटदिशीं–आई, तूं होय म्हणायला आढेवेढे घेत आहेस, माझा जीव कीं नाहीं कावराबावरा झाला आहे– म्हणना होय चटदिशीं आई–कासावीस होतो आहेग जीव आई–होय म्हणायचें कां टाळीत आहेस ?

**माल०:**—बाळे, मी तुझ्या मनोगताच्या विरुद्ध कधीं तरी जाईन का ?–पण मुली, तिकडची संमति असल्याशिवाय मी कशी चटदिशीं होय म्हणूं ?–पण, किंतु, परंतु–माझें कांहीं नाहीं हो, नारद मुनींचें आहे आणि नारद मुनींच्या इच्छेबाहेर तिकडून वागणें व्हावयाचें नाहीं, तुला माहीतच आहे.

**सावि०:**—नारदमुनी तरी पण पण काय म्हणून म्हणत आहेत, तें तरी मला सांग; काय आलें आहे नारदमुनींच्या मनांत ?

**गाय०:**—हत्तीजवळचा सत्यवानाचा पराक्रम त्यांनीं पाहिला आणि अगदीं संतुष्ट झाले—

**सावि०:**—मग पण काय ?

**माल०:**—माझ्यादेखत तिकडून पुष्कळ फोडफोडून विचारणें झालें; सत्यवानाचें कुल, शील, रूप, पराक्रम, विद्या—सर्वांबद्दल अगदीं खुलासेवार विचारणें झालें—

**गाय०:**—रूपवान आहेत, पराक्रमी आहेत, हातच्या कांकणाला आरसा कशाला ?

**माल०:**—रूपाबद्दल, पराक्रमाबद्दल, कोणाचेंच दुमत नाहीं.

**सावि०:**—मग पण-किंतु—आला कोठून ? ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडले आहेत म्हणून का नको म्हणतात ?

**माल०:**—नाहीं तसेंहि दिसलें नाहीं.—मंत्री दारिद्र्याबद्दल बोलत होते, पण मला तें पटलें नाहीं, तिकडेहि आवडलें नाहीं; आणि नारदमुनींनीं तर दारिद्र्याचे कहाणीला झिडकारूनच टाकलें !—मुली काय सांगू तुला, नारदमुनी सत्यवानाच्या शीलाची, तपश्चर्येची, आईबापांच्या सेवेची, रूपाची, पराक्रमाची तारीफच करीत सुटले, पण अखेरीस किंतु आला—

**सावि०:**—माझें दैव कोठें निष्ठुर होत आहे, सांग ना आई चट्दिशीं.

**माल०:**—मुली, मला तें अद्याप समजलेलें नाहीं; आतां नारदमुनींजवळ तिकडून जाणें झालें आहे, सर्व समजून घेऊन नारदमुनींना तुझ्याजवळ घेऊन येण्याचा विचार आहे.—नारदमुनींचें म्हणणें नीट सर्व ऐकून घे असें तुला सांगावें म्हणून मी पुढें आलें.

**सावि०:**—पण आई, तुझा काय अंदाज चालतो, काय घोळतें आहे नारदमुनींच्या मनांत—आई तुला कांहीं थांग लागला असला पाहिजे—सांग ना मला—अंदाजानें सांग—

**माल०:**—माझी नाहीं बाई कांहीं बुद्धि चालत—एक आपलें मनांत—कदाचित् आम्हां बायकांचें मनच भित्रें म्हणून मला तसें वाटत असेल—सांगूं तुला मला काय वाटतें तें—

**सावि०:**—सांग, चट्दिशीं सांग, अगदीं आढेवेढे घेऊं नको—

**माल०:**—हें बघ ते मोठे तपस्वी आहेत, महासाधु होण्याचा संभव आहे, सत्यवानानें अखंड ब्रह्मचारी व्हावें असें नारद मुनींना जर वाटत असलें तर लग्न म्हणजे असल्या बेतांत विघ्नच—

**सावि०:**—पण तसें कांहीं नाहीं आहे आई, मला सगळें माहीत आहे; ब्रह्मचारी रहावयाचा बेत त्यांचा नाहीं; गायत्रीला माहीत आहे सर्व; तूं कां बोलत नाहींस गायत्री ?

**गाय०:**—राज्याला जर मुकलेले नसते तर आपण होऊन त्यांनीं मागणी घातली असती, असें चित्राश्व म्हणत होते—

**सावि०:**—शिवाय माझ्याशीं बोलणें चालणें चार पांच प्रसंगीं झालें आहे—कोठें काय लपतें का—न सांगतां सर्वांना सर्व कांहीं समजतें.

**गाय०:**—ब्रह्मचारी रहाण्याचा उद्देशच नाहीं—एक वर्षाहून अधिक दिवस मेध्यारण्यांत रहावें लागणार नाहीं, अशीच त्यांची सर्वांची समजूत आहे.

**सावि०:**—अरण्यांत रहाणें निराळें आणि ब्रह्मचारी राहणें निराळें—अरण्यांत राहणारे गृहस्थाश्रमी काय कमी आहेत !—

**माल०:**—असेंच कांहीं तरी नारद मुनींच्या मनांत घोळतें आहे—जन्मभर अरण्यांत रहाण्याचा प्रसंग सावित्रीवर आला तर कसें, ह्याची काळजी त्यांना पडली असावी—

**सावि०:**—त्यांच्या सहवासांत एक जन्म सोडून सात जन्म मी अरण्यांत काढीन.—अरण्यांत झाले तरी ते राजे आहेत, सर्वांचे महाराजे आहेत, समजलीस आई, पशुपक्षी देखील आपआपसांतील वैरभाव विसरून त्यांच्या-जवळ रहावयास मिळण्याकरितां धडपड करीत असतात; त्यांच्या कोमल हाताचा स्पर्श व्हावा म्हणून वेली सुगंधी फुलांनीं नेहमीं फुललेल्या असतात; त्यांची सेवा हातून घडावी म्हणून स्वादिष्ट फळांनीं वृक्ष ओथंबलेले असतात; त्यांना प्रसन्न करण्याकरितां शीतल मंद व सुगंधी वायु मेध्यारण्यात नेहमीं वाहतो; आणि त्यांच्या तृप्तीकरितां अमृतासारखे झरे निरंतर येथें वहात

असतात. चराचर सृष्टीवर हुकमत चालविण्याचें सामर्थ्य ज्यांच्या शीलांत भरलेलें आहे, ते अरण्यांत राहिले तरी मोठया नगरींतल्या सत्ताधाऱ्यासारखेच सर्वांना वंदनीय झाल्याशिवाय कसे राहतील ?–आई, नारद मुनींच्या मनांतील सर्व शंका मी दूर करितें, मला घेऊन चल कशी नारद मुनींच्या दर्शनाला.

माल०:—नारदमुनींनाच मी इकडे पाठवून देतें–चल गायत्री, हिचें सर्व म्हणणें नारदमुनींना सांगू; आणि त्यांनाच हिची समजूत करायला इकडे पाठवून देऊं; सोनारानें कान टोंचल्याशिवाय भागायचें नाहीं.

[ मालवी व गायत्री जातात.

सावि०:—वनवासी व तपस्वी, नारदमुनींना पसंत पडलेच पाहिजेत.–नारदमुनी बाबांचे गुरु, आईचा पूर्ण भरंवसा त्यांच्यावर, मला तर नारदमुनी आले म्हणजे माझें मूर्तिमंत दैवच पुढें उभें आहेसें वाटतें.–दैवीं काय लिहिलें आहे तें आतां कळेल–दैव, देव, आणि पूर्वजन्माचें कर्म, तिन्ही एकच–माझें कर्म माझ्या विरुद्ध आहे काय ? माझें दैव माझ्या लग्नाच्या आड येत आहे काय ? माझा देव माझें लग्न मोडूं पहात आहे काय ?–दैव, देव व कर्म सर्व माझ्या विरुद्ध जाऊं देत; माझें प्रेम खरें आहे, माझी वासना शुद्ध आहे, आणि माझ्या बुद्धीचा निश्चय पक्का आहे; नारदमुनींनाहि मी ह्या माझ्या लग्नाचा रुकार द्यावयाला भाग पाडीन.–खरी भक्ति असल्यावर देव अखेरीस भक्ताचेच बाजूला झुकतो.

पद २७, राग–पहाडी; ताल–कवाली; चाल–" चल चालो गोकुल रे. "

**भजनानें आळविला । देव दैवसम कधिं न उलटला । एसा**
**महिमा गाइला ॥ धृ० ॥ भेद न माना भजना शीला । जीवन**
**समजा भजन-कला ॥ १ ॥**

त्यांचे सद्गुण आणि माझी भक्ति ह्यांचा मिलाफ प्रेमानें केल्यावर संकटाचें निवारण करण्याकरितां देव धांवून आल्याशिवाय कसा राहील ?

[ गायत्री व मालवी येतात.

**गाय०:**—अग सावित्री, महाराज आणि नारदमुनी हे इकडेच येत आहेत; अर्ध्या वाटेंतूनच आम्ही परतून आलों—

**माल०:**—नारदमुनींशीं शांत चित्तानें बोल हो; तिकडच्या मर्जीबाहेर जायचें नाहीं; मी पाहिजे तर मागाहून सुधरून घेईन; तसेंच वाटलें तर आतां गप्प बैस, कांहींच बोलूं नकोस.—हे आले नारदमुनी.

[ नारद व अश्वपति येतात. सावित्री नमस्कार करिते.

**नारद०:**—सावित्री, तुझें कल्याण असो; तुझ्या लग्नाची वार्ता कानीं पडल्यामुळें मी येथें आलों आहें. सत्यवानाला डोळ्यानीं पहावें व तुझ्याशीं दोन शब्द बोलावेत, एवढेंच माझें मेध्यारण्यांत सांप्रत काम; पहिला भाग झालाच आहे—

**अश्व०:**—राज्याला मुकलेला, हा दोष बहुबुद्धि व सुमती ह्यांनीं काढला आहे; पण मला स्वतःला त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. मी स्वतः पाहिजे त्या वेळीं द्युमत्सेन महाराजांना त्यांचें राज्य जिंकून परत देईन—

**नारद०:**—सत्यवानाच्या अंगींहि तो पराक्रम भरपूर भरलेला आहे. शिवाय पराक्रम आणि राज्य हीं दोनहि त्याच्या तपस्येपुढें फिकीं पडणारीं आहेत. पराक्रम अंगीं ओतप्रोत भरलेला असून स्वार्थाचे वेळीं साधूप्रमाणें वागणाऱ्या व दुसऱ्याच्या संकटाचे वेळीं सर्व पराक्रम खर्ची घालणाऱ्या उदार पुरुषांचेंच कौतुक वैकुंठांत अधिक होतें. ज्यांचें मन मोठें ते मोठे; असल्या ज्या मोठयांची कीर्ति वैकुंठापर्यंत गेली आहे त्यांत सत्यवानाचें नांव प्रमुख आहे. सत्यवानाला वर म्हणून पाहण्याकरितां आपण मेध्यारण्याकडे निघाला आहां असें जेव्हां माझ्या निदर्शनास आलें, तेव्हां सत्यवानाच्या प्रारब्धयोगाची सर्व माहिती मिळविली, आणि अश्वपति महाराज, लग्न होऊन भलती आपत्ति सावित्रीवर कोसळूं नये म्हणून मी येथें धावून आलों. अश्वपति महाराज, महाराणी मालवी, आणि सुशीले सावित्री, सत्यवानाचे सद्गुण सर्वोत्कृष्ट आहेत, पण—पण—त्याच्या दैवरेषेंत एक मोठा दोष आहे—मोठा दोष आहे—

अश्व०:—सत्ताहीन व धनहीन हे दोष मला भरून काढतां येतात, तसाच जर तोहि दोष असेल—

नारद०:—तसा तो दोष नाहीं. त्या दोषावर कोणाची कांहीं मात्रा चालण्यासारखी नाहीं; तो प्रारब्धयोग टाळतां येण्यासारखा नाहीं—

सावि०:—चंद्राचे कलंकाप्रमाणें एखादा दोष इतर सद्गुणांना अधिक उज्वल केल्यावांचून राहणार नाहीं.

नारद०:—तसाहि तो दोष नाहीं.—अश्वपति महाराज, आजपासून बरोबर एक वर्षानें सत्यवान मरणारा आहे. हा मृत्यू माझ्या हातून टळणारा नाहीं. सत्यवानाशीं लग्न करणें म्हणजे जाणून बुजून वैधव्याचे अग्नींत उडी टाकणें होय,—अश्वपति महाराज, वंशवृद्धि व्हावी म्हणून आपण यज्ञ केला, आणि गायत्री मंत्राची देवता प्रसन्न होऊन तुम्हाला ही सावित्री कन्या झाली; लग्न झाल्यापासून एक वर्षाचे आंत ही विधवा व्हावी असा वर पसंत केल्यानें वंशवृद्धीचें पुण्य तुम्हाला कसें मिळेल? जन्म आणि मृत्यु तुमच्या आमच्या हातचीं नाहींत; येथें कोणाचें कांहींच चालण्यासारखें नाहीं, मृत्युपुढें सर्वांना नमावें लागतें.

पद २८; राग—जिल्हाखमाज; ताल—दीपचंदी; चाल—"ऐसी ना मारो पिचकारी"

**यमनियम नच मानी अमर देवा। मरण-धर्मा ह्या नसे कसली**
**येथ पर्वा॥ धृ०॥ यम-मरण जरि सत्य-शोधन। यम धरि**
**सत्यशीलाजवळि गर्वा॥ १॥**

भागवत धर्माचे तुम्ही अनुयायी म्हणून मला तुमचा कैवार; पण मी तरी येथें काय करूं? मृत्युपुढें हात टेकावे लागतात.

सावि०:—मृत्युमुळें काय म्हणून दबून जावयाचें? मृत्यु टाळतां येत नाहीं; मग त्याची भीति कशासाठीं?—मृत्यु सामोरा आला, मरून जावें; शोक करीत बसण्याचें कारण काय? मृत्यु प्राण घेऊं शकतो, पण आमच्या चरित्राचा ओघ पालटूं शकत नाहीं.—मृत्यूच्या भीतीमुळें शील सोडणें किंवा

न सोडणें आमच्या हातीं आहे, मृत्यूच्या हातीं नाहीं. एक वर्षानें मृत्यु येणार म्हणून त्यांनीं आपलें शील सोडण्याचें कारण नाहीं किंवा मीहि माझें शील सोडण्याचें कारण नाहीं. मृत्यूचे पायीं माझे चरित्रांत बदल कां व्हावा ?

माल०:—चरित्रांत बदल नव्हे सावित्री, विवाहाचे चरित्राला आरंभ नीट व्हावा, घाईघाईनें अल्पायुषी पुरुषाचे पदरांत तूं पडूं नयेस, आणि हातचा बाण निघून जाण्याचे पूर्वी सावरून घ्यावें, असें नारदमुनींचें म्हणणें आहे.—अल्पायुषी जांवई कोणतीहि आई पसंत करणार नाहीं. म्हणून म्हणतें सावित्री, मृत्यु सत्यवानाचे सभोंवतीं घिरट्या घालीत फिरत आहे. तेव्हां जांवयाचा शोध करण्याकरितां आम्हीं मेध्यारण्य सोडून दुसरीकडे जावें, हें चांगलें नाहीं का ?

अश्व०:—मृत्यूवर कोणापाशीं कोणता इलाज आहे ? मृत्यूला नमस्कार करून दुसरीकडे जाणें, ह्यांतच कल्याण आहे.

सावि०:—बाबा, मृत्यूवर इलाज पाहिजे कशाला ? मृत्यूला न भिणें, हाच मृत्यु तरून जाण्याचा उपाय आहे.—मृत्यु नाहीं कोणाला ! आम्हां सर्वांना मरण आहे; आमचा मरणाचा दिवस समजला नाहीं, तिकडचा समजला, एवढाच फरक ना ? ह्या एवढ्या फरकासाठीं मी मृत्यूपुढें हार कां खाऊं ?—बाबा, ज्याला तूं पसंत करशील त्याला तुला मी देईन, असें आपण मला वचन दिलें; आपल्या आज्ञेप्रमाणें त्यांना मी पसंत केलें व मनानें वरिलें; मृत्यूचा बागुलबुवा दाखवून माझें मन मी मागें कसें परतवूं ? वरवर बाह्य उपाधीमुळें प्रीतीचा भास झाला असता तर गोष्ट निराळी होती; पवित्र अंतःकरणाचें खरें खरें प्रेम त्यांच्यावर माझें बसलें आहे; ह्या प्रेमाला, बाबा मृत्यूची प्रतिष्ठा नाहीं; हें प्रेम, आई, मृत्यूमुळें असें असें बिलकुल वळायचें नाहीं; माझें प्रेम, मुनिवर, मृत्युसकट तिकडच्या चरणांचा स्वीकार करीत आहे. मुनिवर, बाबा, आई, मी मनानें तिकडची झालें आहें; त्यांना सोडून इतराचे गळ्यांत माळ घातल्यानें मी आपल्या व माझ्या शीलाला व्यभिचाराचा कलंक लावल्यासारखें नाहीं का होणार ?

**अश्व०:**—मुली, मी तुला तसें वचन दिलें आहे हें खरें; पण विधिपूर्वक लग्न झालेलें नाहीं, तेव्हां वेळींच सावध व्हावयाला कोणती हरकत?

**माल०:**—जन्मभर दुःख करीत बसण्यापेक्षां मृत्यूपुढें नाइलाज म्हणून दुसरा मार्ग कां स्वीकारूं नये?

**सावि०:**—जन्मभर दुःखी होण्याहून दुसरा मार्ग कोणता आहे? त्यांना सोडून दुसऱ्या कोणालाहि मी वरिलें तरी माझें सर्व आयुष्य दुःखांतच जाणार; मग सुखाचें एक वर्ष तरी मीं हातचें कां दवडूं? शिवाय बाबा, आई, ते आणि मी एक झाल्यावर एकमेकांच्या शीलांत, व्रतांत व भक्तींत जें नवें बळ उत्पन्न होईल त्यामुळें हा विनाशी संसार आम्ही कशावरून तरून जाणार नाहीं? एकटया सावित्रीला मृत्यु भय दाखवील, तिकडे एकटयांना गांठून मृत्यु आपलें काम साधील, पण दोन प्रेमी जीवांच्या ऐक्यापुढें पळ काढणें मृत्यूलाहि भाग पडेल.

पद २९; राग–पिलू; ताल दादरा; चाल–"जाग जाग."

**प्राणनाथ जाता मम देह येथ राहिना। प्रेम प्राण एक जाण;**
**मरण तोडिना ॥ ध्रु० ॥ हृदयीं श्रद्धा भरे। बोल खरे,**
**पतिव्रता निज शीला सोडिना ॥ १ ॥**

मृत्यु जवळ असो वा दूर असो, त्यांची व माझी ताटातूट करूं नका.– ताटातूट केलीत तर आजच मला मृत्यु येईल; लग्न होऊं दिलेंत तर एक वर्षानंतरचा मृत्यु दूर लोटण्यास माझें शील व माझें प्रेम त्यांना मदत करील.– मी आजच मरावें, अशी आपली इच्छा आहे काय!

**नारद०:**—अद्याप प्रत्यक्ष लग्न लागलेलें नसल्यामुळें हें लग्न मोडलें तरी शास्त्राच्या दृष्टीनें गैर नाहीं, एवढेंच माझें सांगणें आहे.

**अश्व०:**—नारदमुनींच्या इषारतीचा विचार अवश्य केला पाहिजे.– सावित्री, नारद मुनींच्या संमतिशिवाय ह्या लग्नाला मी कांहीं संमति देणार नाहीं.–नारद मुनींची समजूत घाल आणि मग काय करावयाचें असेल तें कर.

**सावि०:**—बाबा, आपली संमति नाहीं, मग नुसतें माझ्या मनांत असून काय उपयोग ?–मी आईबापांच्या इच्छेविरुद्ध वागत आहे असें त्यांना समजल्यावर,–आईबापांची सेवा हाच त्यांचा प्रत्यक्ष धर्म; माझा स्वीकार ते कसे करतील ?–हें लग्न असें मोडलें म्हणजे माझें जीवितच संपलें म्हणून समजा.–एक वर्षानंतर मृत्यूनें त्यांना गांठल्यावर मीहि मृत्यूला माझे प्राण अर्पण करीन, ह्यांत आई, बाबा, जराहि संदेह मानूं नका.–एक वर्षानें मी मरावें का आजच मरून जावें, बाबा आपल्या मनांत येईल तें खरें.

**माल०:**—मुली, असें वैतागानें बोलून कसें चालेल ? तुझ्या सुखाकरितां आमचें अन्तःकरण कसें तिळतिळ तुटतें आहे.

**सावि०:**—माझ्या सुखाची काळजी, आई, तूं वहात नाहींस असें कोणत्या तोंडानें वदूं ? माझ्या कल्याणाकरितां बाबांचा सर्व उद्योग आहे, हें मला का कळत नाहीं ? माझ्यावर नारद मुनींचा अनुग्रह आहे म्हणूनच मेध्यारण्य नारद मुनींनीं पवित्र केलें ना ? पण बाबा, आई, आपण जो मार्ग सुचवीत आहां त्या मार्गानें गेलें असतां माझें शील व्यभिचारी ठरून मला कमीपणा येणार आहे. शील नाहीं तर भगवद्भक्तीचा उपदेश नारद मुनींपासून कशाला घेतला ?–मुनि महाराज, प्रल्हादाला आपण भक्तिमार्गाला लावलें आणि त्यामुळें तो इंद्राहूनहि थोर झाला. इंद्र ज्ञानी होता, प्रल्हादाला आपण ज्ञानी व शीलवान केलेंत. ह्या शीलामुळें प्रल्हादाचें शिष्यत्व इंद्राला पत्करावें लागलें. गुरुची सेवा करून इंद्रानें जेव्हां शील प्रल्हादापासून मागून घेतलें आणि प्रल्हादानें शील जेव्हां इंद्राला दिलें तेव्हां शीलाबरोबरच ऐश्वर्य, पराक्रम, विजय, सुख व धर्म ह्यांनीं इंद्राचे शरिरांत प्रवेश केला व इंद्र पुन्हां इंद्र झाला. हा शीलाचा महिमा, मुनि महाराज आपणच वर्णिला आहेना ? मग ज्या मार्गांत शील नाहीं म्हणजे ऐश्वर्य नाहीं, पराक्रम नाहीं, विजय नाहीं, सुख नाहीं व धर्म नाहीं, त्या मार्गानें जावयास मला कां सांगतां ?–शास्त्राज्ञा मोडल्यासारखें होत नाहीं–निमित्ताला टेकलेल्यांनीं शास्त्राचीं अक्षरें

दुसरीकडे नाहींत म्हणजे झालें; पण मी निमित्ताला का टेकलें आहें ? लग्नविधीचा विचार करितांना प्रेमाचा प्रवाह नको का बघायला ? सामान्य व्यवहारांतहि द्रव्य पुनः पुनः तेंच तेंच दान करितां येत नाहीं, मालकीवरचा हक्क एकदांच सोडतां येतो, तसें प्रेमहि झालें तरी एकदा दिलें म्हणजे दिलें–तें मागें घेतां येत नाहीं किंवा वारंवार दुसऱ्याला देतांहि येत नाहीं.–मी त्यांना सर्वस्व अर्पण केलें आहे; माझें त्यांच्याशीं लग्न लावून दिलेंत तर मला तारल्यासारखें होईल; हें लग्न आपण मोडलें तर मला मारल्यासारखें आहे.–मुनिमहाराज, आपणाला मी शरण आलें असून आपण आतां मला तारा किंवा मारा. [ नारदाचे पाय धरिते.

**नारद०:**—ऊठ सावित्री, ऊठ; तुझें मन शुद्ध, तुझी बुद्धि निश्चयाची, आणि तुझें शील पवित्र, तुझ्या अंतःकरणाची जी प्रवृत्ति तीच कल्याणाची ठरणार ह्यांत शंका नाहीं.–अश्वपति महाराज, सत्यवान व सावित्री ह्यांच्या लग्नाला मी माझी संमति देत आहें.–सावित्री, मी धावून आलों तें तुझें हें लग्न मोडण्यकरितां नव्हे, तर–पुढील संकटाची जाणीव करून देऊन तुझ्या शीलाच्या जोरावर तुला ह्या संकटांतून कसें पार पडून जातां येईल ह्याच्या मार्ग तुला सुचवावा म्हणून मी मेध्यारण्यांत आलों आहें.–सावित्री, तुझ्यासारख्या सुशील, पवित्र, धैर्यशाली व निश्चयी कन्यांचा संसार धर्माच्या ऐश्वर्याचा व्हावा म्हणून तर त्रिलोकांत फिरून भगवद्भक्तीचा उपदेश मी करीत असतों.–सावित्री, पतीवरील तुझें प्रेम जर अप्रतीम ठरलें तर मी जें भगवद्भक्तीचें व्रत आतां तुला सांगणार आहें, त्या व्रतामुळें तूं मृत्यूलाहि तरून गेल्याशिवाय राहणार नाहींस.

**सावि०:**—आपलें जसें मला दर्शन घडलें तसें त्यांचे प्राण हरण करण्याकरितां एक वर्षानें येणाऱ्या यमराजाचेंहि दर्शन मला घडेल, आणि तिकडच्या प्राणांशीं माझेहि प्राण नेहमीं संलग्न राहतील, असा आशीर्वाद देऊन व्रताचा उपदेश मला करावा.

**नारद०**:—सावित्री, तुझ्या आतांपर्यंतच्या पुण्याईनें आणि पुढील वर्षांत जी प्रेमाची तपश्चर्या तूं करशील त्या तपश्चर्येच्या जोरानें यमाचें दर्शन तुला घडेल, आणि तुझ्या इच्छेविरुद्ध तुझ्या व सत्यवानाच्या प्राणांची ताटातूट यमहि करूं शकणार नाहीं, असा तुला माझा आशीर्वाद आहे.—सावित्री, ह्या वटवृक्षाप्रमाणेंच ऊर्ध्वमूल व अधःशाखा असा हा विश्वाचा पसाऱ्याचा वृक्ष आहे; हा क्षणाक्षणाला मरणारा असला तरी क्षणाक्षणाला तितक्याच जोरानें जगणारा असल्यामुळें, मृत्यूवर इलाज शोधणारांनीं ह्या वटवृक्षाला पूजेचें प्रतीक करून विश्वमय परमेश्वराची विश्वासकट उपासना केली पाहिजे.—सावित्री, एक वर्षानंतर आजपासून तीन दिवस उपास करून वटवृक्षाच्या पूजेनें, सदा जोरांत असणाऱ्या आणि नव्या जन्मणाऱ्या विश्वाच्या भरपूर प्रवाहाची तूं आराधना कर म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूशीं तूं बोलशील, चालशील, आणि तुझे प्राण सत्यवानाच्या प्राणाबरोबर विश्वाच्या निरनिराळ्या लोकांतून चालले असतांना विश्वांतील कोणतीहि शक्ति तुला अडथळा करणार नाहीं. सत्यवानाचे प्राण परत आणणें किंवा त्याच्या बरोबर कायमचें जाणें हें सावित्री आतां तुझ्या धैर्यावर व तुझ्या भक्तीवर अवलंबून आहे. अश्वपति महाराज, सत्यवान व सावित्री यांचें लग्न शुभस्य शीघ्रम् ह्या न्यायानें होईल तितक्या लवकर आपण घडवून आणावें, असें माझें आपणाला सांगणें आहे. जा, आतां लग्नाच्या तयारीकरितां शिबिरांत जा.

पद ३०; राग–जिवनपुरी; ताल एकताला; चाल–" घडि घडि पल पल. "

**हरि नच, शिव नच, गुरु नच देत पापपुण्य कदा। फल निपजे कर्मा, दुःख तसें सौख्या सदा ॥ धृ० ॥ तिडतिड नाचत आला, पापपुण्य त्याला, जीव कर्म झाला। सोबत घे देव–पदा ॥ १ ॥**

[ पडदा.

---

# अंक चवथा.



## प्रवेश पहिला.

[ स्थळ—अश्वपतीची राजधानी; सुमति मंत्र्याचा महाल; सुमति व बहुबुद्धि बोलत बसले आहेत, असा देखावा. ]

सुम०:—सत्यवान आणि सावित्री ह्यांच्या लग्नाला दोन दिवसांनीं एक वर्ष होऊन जाईल. महाराज व महाराणी उद्यीक मेध्यारण्याकडे जावयास निघणार आहेत, मलाहि बरोबर जावें लागेल. तुमच्या संबंधानें काय आज्ञा झाली?

बहु०:—अद्याप कांहीं आज्ञा झाली नाहीं; मीहि कांहीं विनंति केली नाहीं. म्हटलें आपण होऊन सवंग होऊं नये. गरज नसतांना आमंत्रण लावलें म्हणजे सर्वांचें ओझें वहावें लागतें; केले कष्ट, पण सामर्थ्याच्या वऱ्हाडयांनीं वेठीला पकडलेल्या बैलाचे कपाळीं अखेर कडबाच; अशी माझी आणि महामतीची दुर्दशा करण्यांत येते— [ महामती येतो.

महा०:—मी नाहीं कधीं कडबा खावयाचा बाबा; मांजर व्हावें पण बैल नको व्हावयाला—कडबा कोण खातो?—डोळे मिटून दूध प्यावें दूध—बोका मिशीला तूप चोळी, द्या बाबा टाळी.

बहु०:—मेध्यारण्यांतून बोलावणें आलें आहे म्हणून मीं ऐकलें; कोणा-कोणाला राजकन्येनें बोलावलें आहे? [ कल्याणी व गायत्री येतात.

कल्या०:—सर्वांना सावित्रीनें बोलावलें आहे.

गाय०:—कोणीहि मागें राहूं नये, अशी सावित्रीची इच्छा आहे. आग्रह करून सर्वांना घेऊन ये, असा महाराणीसाहेबांना सावित्रीचा निरोप आहे.

कल्या०:—लग्नाच्यावेळीं घाईघाईनें कार्य उरकून घ्यावें लागलें; आतां वर्षासणाचे वेळीं कांहीं घाई नाहीं, तेव्हां सर्वांना घेऊन ये एरव्हीं मला बरें

वाटायचें नाहीं, असें महाराणीसाहेबांपाशीं सांगायला सावित्रीनें सांगितलें आहे. लग्नाच्या वेळच्या मेजवान्यांचा समारंभ वर्षानंतर आतां व्हावयाचा आहे—सर्वांनीं आतां पक्वान्नें झोडावयास मेध्यारण्यांत यावें, असें गौतम मुनींच्या तर्फेचेंहि आमंत्रण आहे.

**सुम०:**—आतां संकट कांहीं उरलें नाहींना ?

**कल्या०:**—संकटाकरितां सावित्रीनें कालपासून तीन दिवसांचें उपोषण सुरू केलें आहे; उद्यांक पौर्णिमेच्या दिवशीं उपोषणाचा तिसरा दिवस संपणार असून परवां व्रताचें पारणें आहें; त्या वेळीं सर्वांनीं यावें आणि वर्षासण साजरा करावा असा सावित्रीचा आग्रह आहे.—वर्षासण यमाचे घरीं तरी होईल नाहीं तर मेध्यारण्यांत होईल असें सावित्रीचें म्हणणें असून, गौतम-मुनींची खात्री आहे मेध्यारण्यांतच होणार म्हणून. पारण्याचा समारंभ गौतम-मुनींकडून व्हावयाचा असून वर्षासणाचा थाट अश्वपति महाराजांकडून अपूर्व होईलच—आतां कसलें संकट ?

**महा०:**—पण संकट पक्कें टळलेंना ?—बाबा संकट संकट म्हणून गेल्या वर्षापासून मी ऐकतों आहें; सत्यवान—सावित्रीच्या ऐन लग्नाच्या वेळीं संकट म्हणून एक चिलिट माझ्या कानांत गुणगुणलें, वर्षभर त्याच संकटाचा प्रतिध्वनि एकसारखा कानांत घुमत आला, आणि आज लग्न होऊन वर्ष संपण्याचे वेळीं ही कल्याणी संकट संकट म्हणूनच बोलत आहे !—कोणाचें मरण टळलें, सांग कल्याणी—

**कल्या०:**—कोणाचें, काय, तुम्हाला काय करावयाचें आहे ? संकट कसलें आतां ?

**गाय०:**—महाराणी साहेबांची आज्ञा आहे, आपल्या राजधानींतील सावित्रीच्या आवडीचीं सर्व रमणीय स्थळें ह्या कल्याणीला दाखवावींत, तेव्हां तशी व्यवस्था ताबडतोब सुमति मंत्र्यांनीं करावी; एवढ्याकरितां कल्याणीला येथें घेऊन आलें आहें.

सुम०:—बहुबुद्धि, महाराणी साहेबांच्या आज्ञेप्रमाणें व्यवस्था लावून येतोंच मी परत; थोडा वेळ येथेंच बसावयाचें होतें.–चल गायत्री.

[ सुमति, गायत्री व कल्याणी जातात.

महा०:—बाबा, संकट टळलें म्हणून म्हणतात, तें कोणावरचें टळलें? मरणार होतें कोणसेंसें–कोणाचें मरण टळलें बाबा, तुमचें का माझें?

बहु०:—मी जीवंत आहें, तेव्हां माझें तर टळलेंच—

महा०:—मी मेलों नाहीं, तेव्हां–तेव्हां–माझेंहि टळलेंच–पण मी मरणार होतों कशावरून?

बहु०:— ारे, तुझ्या आणि सावित्रीच्या गोष्टी, लोक नाहीं पण तूं तरी बोलूं लागला होतास ना?–सावित्रीच्या नवऱ्याच्या मरणाचें संकट जो तो कुजबुजत असतो, समजलास मुला!

महा०:—बरें झालें मी सावित्रीचा नवरा नाहीं झालों, नाहींतर मी एव्हांना मेलोंच असतों–बाबा, सावित्रीला मंगळ आहे काय? ठीक झालें, सत्यवानाशीं सावित्रीचें लग्न झालें आणि माझें मरण टळलें. मरणाशीं झुंझायला सत्यवान समर्थ आहे;–हत्तीशीं नाहीं लढला? तसा यमाशीं लढेल, त्यांत काय आहे?–माझी शहामत खरी; हत्तीच्या कचाटींतून सत्यवानानें सोडविलें तर त्याच्या गळ्यांत बांधली नवरी मुलगी मंगळी, द्या बाबा टाळी.

बहु०:—पोरा, असें आचरटपणानें आतां बोलूं नकोस–चल येथून जाऊं कसे. नाहींतर सुमतीच्या कानीं भलतेंच जावयाचें, आणि आमचें वर्षासणाच्या समारंभाचें आमंत्रण बुडायचें.–राजकन्येला मंगळी बिंगळी म्हणूं नकोस, चल चट्दिशीं. [ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ स्थळ–मेध्यारण्य; सत्यवान व सावित्री प्रवेश करितात. ]

सत्य०:—सावित्री, ही वनश्री म्हणजे तुझ्या सासरची राजलक्ष्मी होय;

तेव्हां व्रताच्या निमित्तानें हें अरण्याचें वैभव तुला दाखविण्याची संधी मला आज मिळाली, हें माझें महद्भाग्य नव्हे काय? सार्वभौम राजाचें संपत्तींत आणि सर्व विश्वाचें माहात्म्य एका जागीं गोळा करणाऱ्या ह्या अरण्याचे वैभवांत कोणता फरक आहे? विश्वाचें एकदम आकलन करून देणारे वटवृक्षासारखे सर्वव्यापक वृक्ष येथें आहेत; दिग्गजाप्रमाणें सृष्टीची मर्यादा ठरविणारे उंच वृक्ष येथें आहेत; सर्वांना—साधूंना—पतितांना—सर्वांना सारखा आश्रय देऊन फलाहार देणाऱ्या समदृष्टि गृहस्थासारख्या परोपकारी झाडांनीं तर हें अरण्य भरलेलें आहे; आपल्या सुगंधानें सर्वांचें दुःख हरण करणाऱ्या फुलांनीं सुशोभित दिसणाऱ्या वेली प्रत्येक परोपकारी वृक्षाला येथें प्रेमानें आलिंगन देऊन गृहस्थाश्रमाची थोरवी प्रत्येकाला पटवीत आहेत; हत्ती, वाघ, सिंह हीं सर्व श्वापदें ह्या अरण्याची चतुरंग सेना असून माझ्या परशूमुळें आणि सावित्री तुझ्या शीलामुळें ह्या अरण्यांतील सर्व शक्तींवर आज तुझी हुकमत चालत आहे.

पद ३१, राग—बिलावल; ताल—झपताल; चाल—" माइरी आज अपने "

**विमल कानन—कला तूंची आज्ञा मला। आज्ञांकिता दे निज शील ॥ धृ० ॥ वनसहित संसार तुज शरण आला। वन-देवता तूं रक्षणाला ॥ १ ॥**

पंगु, दुबळे व अनाथ ह्या सर्व शरणागतांना आश्रय देणारें हें अरण्य आहे, असें निःशंकपणें येथें संचार करणारे पक्षी सर्वांना समजून सांगत आहेत. विश्वाच्या संसाराची प्रतिमा असणाऱ्या ह्या अरण्याचे दर्शनानें तुझ्या व्रताची सांगता झाली, असें तुला वाटतें ना सावित्री?

**सावि०:**—आपणाबरोबर आपणासकट हें अरण्य मला पहावयाचें होतें; नसतें विश्व पाहून काय उपयोग? विश्वाच्या अंतर्यामीं संचार करणारा परमेश्वरहि पाहिला पाहिजे. विश्वासकट माझा परमेश्वर म्हणजे मेध्यारण्यासकट ही मूर्ति; ह्या चरणांच्या आतांच्या सेवेनें माझ्या व्रताची पूर्तता झाल्यावांचून

कशी राहील ?—महाराज, ह्या विस्तीर्ण वटवृक्षाच्या छायेखालीं थोडा वेळ बसायचें होतें; सुगंधित फुलांनीं माझ्या देवाला नैवेद्य दाखविल्यावर माझ्या व्रताची समाप्ति होऊं द्या. षोडषोपचार पूजेला येथें जी न्यूनता आहे, ती माझ्या भक्तिभावानें मी भरून काढीत आहे.—बसायचें ना ह्या वटवृक्षाखालीं ?

सत्य०:—सावित्री, निराळी पूजा करण्याचें आतां काय प्रयोजन आहे ? ज्यामुळें तुझा जीव हलक झाला असतांहि माझ्या ह्या वनांतील संसाराच्या दर्शनानेंच व्रताची पूर्णता होणार, असा निश्चय तूं केलास; पूजेनें याहून माझा अधिक गौरव काय होणार ? मी अंगीकृत केलेल्या कार्यांत समदुःखी व समसुखी होणारें तुझें पवित्र शील म्हणजे गेले बारा महिने एकसारखें तुजकडून चाललेलें माझें पूजनच होय. उत्तम भक्त परमेश्वराची ही असली कार्यनिष्ठ पूजा करीत असतो.—राजकन्येशीं लग्न केल्यानें आईबापांच्या सेवेच्या माझ्या प्रत्यक्ष धर्मांत व माझ्या रोजच्या कार्यांत विघ्न उत्पन्न होईल तेव्हां हें बायकोचें व नव्या संसाराचें लोढणें गळ्यांत बांधून घेऊं नकोस, असें म्हणणारे कांहीं मला लग्नाचे पूर्वी भेटले; पण लग्नामुळें सत्कार्याचा उत्कर्ष दुप्पट जोरानें होतो, हें माझें म्हणणेंच एक वर्षाच्या अनुभवानें आज पक्कें खरें ठरलें आहे. सावित्री, वनवासांत माझ्याबरोबर वर्षभर राहिलीस आणि राजधानींतल्या राजविलासांची तुला आठवण होते असें कधीं क्षणभरहि मला भासूं दिलें नाहींस, ह्याहून अधिक माझ्या कार्याचा उत्कर्ष तो कोणता ?

सावि०:—राजधानींतल्या सुखांची आठवण मी होऊं दिली नाहीं असें नव्हे; मला आठवणच झाली नाहीं.—आपल्या सहवासाहून अधिक चांगलें दुसरें एखादें सुख आहे, असें मी मानीतच नाहीं. आपल्या कामकाजांत जेणेंकरून माझ्यामुळें निदान विघ्न उत्पन्न होणार नाहीं आणि आपल्या सत्कर्माची व पुण्याईची मी लहानशी तरी वाटेकरीण जेणेंकरून होईन, असल्या चरित्राहून व शीलाहून अधिक चांगला धर्म मला माहीत नाहीं.—आपण जवळ असलां म्हणजे दुःख म्हणून जगांत कांहीं आहे व संकटाशीं

झुंझावें लागतें ह्याची जाणीवहि नाहींशी होते, आणि मृत्यूलाहि पुरून उरणाऱ्या प्रेममय शक्तीचा प्रत्यक्ष अनुभव येऊन आपण मला धन्य व कृतकृत्य केलेंत म्हणून प्रेमानें आपलीं किती स्तुतिस्तोत्रें गाऊं आणि किती किती नकोत असें मला होऊन जातें! मी आपल्या धर्माच्या आड गेलें नाहीं, इतकेंच नव्हे तर धर्माचरणांत मी थोडीबहुत आपणांस मदत केली, ही आपण मला दिलेली शाबासकी माझ्या आईनें जर ऐकली तर आईचा आनंद त्रिभुवनांत मावणार नाहीं. सत्कार्याच्या उत्कर्षाला लग्नबंधनें विघातक होतात तेव्हां लग्नाची पीडाच नको, असें इकडे वाटत असावें किंवा केव्हांतरी असें वाटूं लागणार, अशी आईला एकेकाळीं भीति वाटत होती—

सत्य०:—माझ्या वनवासामुळें तसा ग्रह होणें साहजिक आहे.

सावि०:—शिवाय नारदमुनी लग्नाच्या उपद्यापांत पडूं नये असा उपदेश करतील कीं काय, अशीहि शंका आली होती.

सत्य०:—हं! त्या शंकेंत कांहीं अर्थ नाहीं. नारदमुनी काय म्हणून तसा उपदेश करतील? नारदमुनी ब्रम्हचारी आहेत हें खरें; पण स्वतः नारायणानें सांगितलेल्या ज्या भागवतधर्माचा उपदेश ते करितात तो धर्म ब्रम्हचाऱ्यांकरितां किंवा संन्याशांकरितां नसून गृहस्थाश्रम्यांनीं जीवन्मुक्त होऊन विश्वाच्या लालनपोषणाकरतां गृहस्थाश्रमाचींच कार्यें लोकसंग्रह दृष्टीनें अखेरपर्यंत कां कशीं केलीं पाहिजेत, हें सर्व भगवद्भक्तांना शिकविण्याकरितां भागवतधर्म आहे; दुष्ट माजले व साधूंचा छळ होऊं लागला म्हणजे परमेश्वर लोकसंग्रहार्थ अवतार घेऊन संसार नेटका करून दाखवितो; परमेश्वराचा तोच कित्ता आपआपल्या अधिकाराप्रमाणें संसारांतच राहून प्रत्येकानें गिरविला पाहिजे, ही भागवतधर्माची मुख्य शिकवणूक आहे. आपण जो कित्ता डोळ्यांपुढें ठेविला असेल त्याची आठवण पतीला सतत देऊन वळण बिघडूं न देणारी बायको मिळाली म्हणजे भागवतधर्माला आनंदच होत असतो.—तुझ्या आणि माझ्या लग्नाला नारद मुनींनीं मोठ्या

संतोषानें संमति दिली असली पाहिजे, ह्यांत मला तर काडीचाहि संशय नाहीं– नारदमुनी आपल्या लग्नाचे आड न येतां माझी आई कदाचित् नको म्हणते कीं काय, अशी मला भीति वाटत होती.

**सावि०:**—मी इकडची पक्की सहधर्मचारिणी झालें आहे, असें आतां एक वर्षानंतर सासूबाईंना वाटत आहेना ?

**सत्य०:**—आतां तर कांहीं संशयच उरला नाहीं.–संसारांत ज्या प्रत्यक्ष धर्माचें ध्येय मीं स्वीकारलें आहे त्याची जोपासना मनोभावें करणारी अर्धांगी तुझ्यासारखी दुसरी मिळणेंच शक्य नाहीं.–बाबांचें मत असेंच आहे; आईच्या परीक्षेला तर पुरी उतरली आहेस आणि मला तर–काय वाटतें सांग पाहूं ?

**सावि०:**—आपणच सांगायचें होतें–काय वाटतें आतां एक वर्षानंतर ?

**सत्य०:**—माझ्या सर्वस्वाची तूं पक्की मालकीण झाली आहेस; माझा प्रत्यक्ष धर्म आतां तुझ्या हातीं आहे; ज्या सत्कर्माच्या उत्कर्षानें मी स्वतःला व तुला परमेश्वराची प्राप्ति करून देणार तें रोजच्यारोज आचरावयाचें सत्कर्म तुझ्या शीलानें वाढीस लागणार आहे; सर्व विश्वाचे हितांत आनंद मानण्याचा धडा तें सत्कर्म तुला व मला हळुहळू शिकवीत असून, त्या सत्कर्माला पूर्ण शांतीचें फळ तुझ्या श्रद्धेमुळें लवकर लागणारें आहे; माझी श्रद्धा तूं, माझी भक्ति तूं, माझी आत्मनिष्ठा तूं,–संसारांत, मृत्यूच्या समयीं, आणि मरणोत्तरहि तूंच माझ्या आत्म्याचें पवित्र कवच–कुंडल आहेस ! आईनें तुझ्यासंबंधानें जसें भाकीत केलें होतें तसें सर्व कांहीं ह्या वर्षांत घडून आलें आहे.

**सावि०:**—आपण असें बोलूं लागलां म्हणजे स्वर्ग दोन बोटें उरला आहेसें मला होऊन जातें ! इकडचें हें मत कळलें म्हणजे आईला किती आनंद होईल ! इतकें माझें मोठें भाग्य आहे, असें मला ह्या पूर्वी कधींच वाटलें नव्हतें; आपल्या शीलाचें, आपल्या धर्माचें, आपल्या आत्म्याचें संरक्षण करण्याचें काम आपण मजवर सोंपवितां–ह्याहून अधिक गृहिणीपदाची

प्रतिष्ठा कोणत्या स्त्रीला प्राप्त होणारी आहे ?–हा मजवर आपला अनुग्रहच झाला आहे; आपल्या पुण्याईची सर्व शक्ति आपण मला दिली आहे, माझा परमेश्वरच नवसाला पावला आहे; ह्या चरणांची सेवा मला निरंतर घडावी, हेंच माझ्या देवापाशीं माझें मागणें आहे.–महाराज, आपण प्रसन्न झाल्यामुळें आपल्या सेवेंत ह्या दासीला व्यत्यय करण्याचें सामर्थ्य आतां मृत्यूचेहि अंगीं उरलेलें नाहीं, अशी खात्री माझ्या जीवाला ह्यावेळीं पटली आहे.

**पद ३२,** राग–भैरवी; ताल दादरा; चाल–"शाम मोहन प्यारी."

**एकवटत जीव जीवा । मरणावरि डाव नवा ।। ध्रु० ।। समरा नाहिं एकला, वीरभाव दुणावला । द्यावें त्या मरणाला मरण-सहित पराभवा ।। १ ।।**

जन्म किंवा मृत्यु ह्यापैकीं कोणालाहि आपली व माझी ताटातूट करतां येणें शक्य नाहीं.

**सत्य०:**—सावित्री, कोण तुझी आणि माझी ताटातूट करणार ? शील व धर्म ह्याहून अधिक समर्थ कोणीहि नाहीं; मीं धर्म पाळीत असतां व तुझें शील कायम असतां ताटातूट करण्याएवढा समर्थ कोण आम्हांला भेटणार ?–विवाहाला मंगलकार्य म्हणतात तें ह्याचमुळें; पतिपत्नीचें सामर्थ्य एकवटल्यावर मोक्षालाहि विवाहित जोडप्याचे उंबरठे घासावे लागतात; आणि इतर जीवांना सन्मार्गाला लावण्याचें विश्वकार्य संलग्न स्त्री–पुरुषांच्या पवित्र चरित्रानें आपो-आप होत असतें.–सावित्री, परमेश्वर–प्राप्तीच्या, मोक्षाच्या, आणि विश्व-कल्याणाच्या प्रतिष्ठेकरितां तूं जन्मास आली आहेस; तुझ्या सहवासांत सर्व पुरुषार्थ मला प्राप्त व्हावयाचे असल्यामुळें मी कधींहि कोणाला तुझी आणि माझी ताटातूट करूं देणार नाहीं.

**सावि०:**—माझ्या पूजेअर्चेचा स्वीकार करावयाचा होता, आणि आपली ताटातूट करूं पाहणारांशीं दोघे मिळून एकजीवानें लढूं अशा आश्वासनाचा प्रसाद मला देऊन, माझ्या व्रताची पूर्णता करावयाची होती.

पद ३३, राग–जिबनपुरी; ताल त्रिवट; चाल–" पूजा रघुनाथकी."
शृंगारुनि नाथ-चरणाला । दर्शन घडतां, व्रत-फल मला ॥ ध्रु० ॥ सुरस नवविधा मानव-श्रद्धा । पूजनविधि शृंगार मानिला ॥ १ ॥

सत्य०:—तुझ्या हातची पूजाअर्चा कोण स्वीकारणार नाहीं ? सम्राटाच्या राजवैभवाला लाथ मारून तूं वनवासांत राहून माझी सेवा करायला हौसेनें तयार झालीस, ह्यावरून आम्हां दोघांचें शील एकवटलेलें आहे, असें माझ्या आईचें मला सांगणें आहे; तुला पूजाअर्चा करावीशी वाटते तर मला ती पूजा आवडती झाल्यावांचून कशी राहील ? सावित्री, हा चमत्कार पहा; सर्व अरण्यांतील सुवासिक फुलांना वाहून आणून तुझ्या पूजेची ही भूमि वनवायु पवित्र, सुंदर व सुगंधित करीत आहे! तुझ्या पूजेची तयारी वृक्ष, वेली, व वायु ह्या तुझ्या हस्तकांनीं मनासारखी केली आहे ना ? कांहीं कमी असेल तर मला सांग; ह्या वृक्षाप्रमाणें, ह्या वेलीप्रमाणें, ह्या वनवायूप्रमाणें, ह्या फुलपुष्पाप्रमाणें माझ्याकडून कांहीं सेवा करून घे आणि तयारी तुझ्या मनासारखी होऊं दे.

सावि०:—आपल्या मधुर व सत्य भाषणामुळें कांहीं न्यून शिल्लक राहिलें नाहीं महाराज.–परमेश्वरप्राप्ति, मोक्ष आणि संसार हीं तीनहि आपल्या चारित्र्यामुळें मला एकाच दर्जाचीं झालीं आहेत. परमेश्वराच्या आणि मोक्षाच्या पायरीवर संसाराला नेऊन बसविणारांची पूजाअर्चा सर्व विश्वाला कल्याण-कारकच ठरणारी आहे.–[ सावित्री पूजा करिते. ] ह्या चरणांची सेवा मला निरंतर घडावी, हेंच ह्या समयीं माझ्या देवापाशीं माझें मागणें आहे.–मला अंतर कधींहि नाहींना द्यायचें ?

सत्य०:—तुला अंतर देण्याची इच्छा माझ्या मनांत कधींतरी येणें शक्य आहे काय ?–सावित्री अशी सचिंत होऊं नकोस, हें घे तुला वचन–तुला कधींहि मी अंतर देणार नाहीं–घे हें वचन–झालें ना मनासारखें–ये माझ्या

जवळ ये आणि मी तुला पुन्हा वचन देतों—सावित्री, ह्या वेळीं तूं अशी खिन्न कां ? तुझ्या व्रताचे परिपूर्ततेच्या वेळीं अंतर, ताटातूट आणि मृत्यूचा व्यत्यय, ह्यासंबंधानेंच विचार तुझ्या मनांत कां खेळत आहेत ? संसार परमेश्वर-प्राप्तीचे व मोक्षाचे आड येणारा नसून, संसारामुळें सत्कार्याचें व सद्धर्माचें परिपालन होतें, आणि मोक्ष हातीं आला असतांहि लोकसंग्रहाकडे पाहून संसार चालविण्यानें विश्वहिताचें परमेश्वरी कार्य भक्तीनें व आनंदानें आपल्या हातून घडतें; म्हणून म्हणतों सावित्री, तुझ्या आणि माझ्या प्रत्यक्ष धर्माच्या सामर्थ्याविषयीं संशयाला तूं आपल्या मनांत बिलकुल जागा देऊं नकोस.—ये अशी जवळ ये, तुझ्या शीलावर विश्वास टाकून माझ्या सत्कार्याचा सर्व भार मी तुझ्यावर टाकला आहे.—सावित्री, तुझी शक्ति माझ्या धर्माचेंच नव्हे तर माझ्या शरीराचेंहि संरक्षण करणारी आहे, असें मला ह्यावेळीं वाटत असून—सावित्री, सूर्य इतक्या जलदीनें कसा अस्तास गेला—हा असा अंधकार झपाट्यानें कसा पडत चालला—मला असें वाटतें का माझ्या डोळ्यांना—अंधकार पडत चालला असें तुला वाटतेंना ?—आईबापांच्या सायंकाळच्या सेवेला मी अंतरणार काय ?—माझी सावित्री आहे—माझ्या आईबापांना कांहीं कमी पडणार नाहीं—काळोख पडत आहे असें तुला वाटतें का सावित्री ?

**सावि०**:—पडतो आहे खरा काळोख-असा लवकर कसा आज पडूं लागला!—आपण काळजी करूं नये; मी जवळ आहें; आपल्या चरणांची सेवा ह्या माझ्या प्रत्यक्ष धर्मांत कोणीहि व्यत्यय आणणार नाहीं, तसेंच आईबापांची सेवा ह्या आपल्या प्रत्यक्ष धर्मांतहि मी कोणालाहि व्यत्यय आणूं देणार नाहीं—

**सत्य०**:—एकाएकीं काळोख पडूं लागल्यानें कसेंसेंच वाटूं लागलें होतें—पण तूं जवळ आहेस—आतां धीर आला—असें काय वाटतें आहे मला सावित्री, सावित्री,—कोणी तरी मला ओढून नेत असून तूं माझें रक्षण करीत आहेस—मी निराधार—आहे तुझा आधार—घाबरूं नकोस सावित्री—बाबांना—आईला

सांग–त्यांची सेवा करण्यांत मला खरा आनंद वाटतो–थोडा वेळ सावित्री असा तुझ्या आश्रयानें–आईबापांची सेवा—

[ व्याकूळ होऊन पडतो; सावित्री सावरून धरते.

**सावि०:**—नारदमुनींनीं सांगितलेली तीच ही मृत्यूची वेळ–यमधर्मानें ह्यांना घेरलें काय ?–आईबापांची सेवा असें म्हणत म्हणत आपण बोलणें बंद केलेंत–मृत्यूनें गाठलें यांना; आपला प्रत्यक्ष धर्म अशा रीतीनें पाळणारांना यमराजा तूं कसा घेऊन जातोस–त्यांच्या प्राणाबरोबर माझे प्राण घेऊन जा–त्यांचा सूक्ष्म देह ज्या पाशांत बांधून तू घेऊन जाशील त्याच पाशांत माझाहि सूक्ष्म देह बांधल्याशिवाय यमधर्मा तुला गत्यंतर नाहीं–सावित्रीच्या प्राणानों, सावध व्हा, तयार असा,–ह्या देहांतून बाहेर पडून त्यांच्या सूक्ष्म देहाबरोबर जायला ही मी आलें बरें–माझी केव्हांची तयारी आहे–कोण येत आहे–कोणाचीं पावलें ऐकूं येत आहेत–यमदूत व यमधर्म ह्याचें दर्शन मला झालेंच पाहिजे–कोण काय बोलत आहे ? [ दोन यमदूत येतात.

**प. दूत०:**—सावित्री फुकट मरूं नको–येथून चट्दिशीं पळून जाशील तर मृत्यूच्या तडाख्यांतून सुटशील–काढ पळ—

**दु. दूत०:**—जरा येथें थांब, आलाच बघ मृत्यु तुला—

**प. दूत०:**—सत्यवानाच्या प्राणांना आम्ही यमपाशांत पकडलें आहें; हा सभोंवार पेटलेला वणावा ( वणव्याचा देखावा ) येथें येऊन पोंचण्यापूर्वी येथून निघून जा; तूं जर येथेंच रेंगाळत राहिलीस तर ह्या वणव्यांत जळून मेल्याशिवाय राहणार नाहींस—

**दु. दूत०:**—पळ येथून, लवकर पळ; आला जवळ वणवा—

**सावि०:**—ह्यांना सोडून मी येथून हलायची नाहीं–माझे प्राण ह्यांच्या प्राणाबरोबर न नेतां ह्यांचे प्राण तुम्हाला नेतां यावयाचे नाहींत—

**प. दूत०:**—आला वणवा जवळ—

**दु. दूत०:**—पळ येथून—

सावि०:—अग्निनारायणा, असाच जवळ ये; उडया टाकीत ये, अति त्वरेनें आपल्या ज्वाळांनीं सावित्रीला ग्रासून टाक; माझ्या शरिराचें प्रथम भस्म होईल नंतर ह्या शरिराला अग्नीचा स्पर्श होईल.—ये मृत्यो ये, जवळ ये, प्रथम माझा बळी घे—त्यांच्या ऐवजीं माझा बळी घे—नाहीं, मी येथून हलायची नाहीं—त्यांच्या प्राणांशीं माझे प्राण असेच नेहमीं चिकटून राहणार—ये, अग्निनारायणा, ये आणि सती जाण्याचें पुण्य माझ्या पदरांत टाक—

प. दूत०:—अग्निनारायणाचे मुखांत पडून सती जाण्याचें भाग्य आहे कोठें तुझें सावित्री ! वणवा दुसरीकडे पेटत चालला आणि त्यामुळें जंगलांतले वाघ, सावित्री ह्याच बाजूला येत आहेत—पळ सावित्री, भलत्या नादानें फुकट मरूं नको—पळ येथून—

दु. दूत०:—हा आलाच बघ वाघ—घातली झाप तुझ्यावर—पळ—पळ—सावित्री—पळ — — [ एक वाघ झाप टाकतो.

सावि०:—अशा रूपानें मृत्यु आला तरी तो मला पाहिजेच आहे; वाघाच्या जबड्यांत ही मी माझी मान देतें. ( तसें करिते ) माझें शरीर प्रथम छिन्नभिन्न होऊं द्या—ही सावित्री ह्यांच्या प्राणांचें कवच आहे—मला मारल्याशिवाय त्यांना कोणीहि स्पर्श करूं शकणार नाहीं.

प. दूत०:—तसें नाहीं सावित्री तुझी मान वाघाच्या जबड्यांत सांपडली आहे, अशी संधी साधून सत्यवानाला चावणारा सर्प तुला चुकवून—हा वळला बघ महाविषारी सर्प—पळ सावित्री पळ—

दु. दूत०:—सर्प चावून सत्यवान मरणार.—तुला यमहि दिसणार नाहीं, यमाचे पाशहि दिसणार नाहींत.—हा विषारी नाग,— [ नाग दिसतो.

सावि०:—( नाग हातांत धरून ) विषारी मृत्यो, माझ्या हाताला चावा घ्या, आणि आपल्या अंगांतील सर्व विष माझ्या रक्तांत भिनून जाऊन वाघाच्या अगोदर आपल्या हातून मला मरण येऊं दे—अग्नि, वाघ व नाग—तीन तऱ्हांनीं एकदम मला मारून टाका, पण यमराज, मला सोडून यांना घेऊन

जाऊं नका–यमराज, मला सोडून यांना घेऊन जाऊं नका–वणवा दिसला, आपलेंच दिव्य दर्शन मला झालें, अग्नीचें जें तेज तें आपलें तेज आहे; वाघाच्या दाढेंत मी मान ठेवली, यमराज, आपण दिसायला क्रूर, पण आईच्या मांडीनेंहि माझ्या मानेला इतक्या नाजूकपणानें कधीं संभाळलें नाहीं; यमराज, आपण आईइतके ममताळू आहां; ह्या नागाचा माझ्या हाताला होत असलेला स्पर्श मला सांगतो, यमधर्म, आपण वज्रासारखे कठोर नसून कुसुमासारखे मृदु आहां–महाराज, देवतेच्या स्वरूपांत मला दर्शन देण्याइतके दयाळु नाहीं का आपण ह्यावेळीं होणार ?

[ वाघ, सर्प व दूत अदृश्य होतात; यमधर्म दिसतो.

**यम०**:—सावित्री, मी यमधर्म तुला दर्शन देत आहें.

**सावि०**:—यमराज, आपल्या चरणांचें दर्शन झाल्यामुळें आईबापांजवळच मी उभी आहें, असें मला वाटतें.

**पद** १४. राग–जोगी; ताल कवाली; चाल–" दीजे दरसन गिरिधारी. "

**उभी जवळि जणु माहेरा । तूंचि पिता मज प्रेमळ माता । तूंचि सखा निज सोयरा ।। ध्रु० ।। पति मम आला श्वशुर-गृहाला । वर्षसण करिल साजरा ।। १ ।।**

**यम०**:—सावित्री, सत्यवान महापुण्यवान असल्यामुळें त्याच्या प्राणांना परलोकीं नेण्याकरितां मी यमधर्म स्वतः आलों आहें, आणि तुझ्या व सत्य-वानाच्या शीलाला साजेसें व्रत तूं आतां नारदमुनींनीं सांगितल्याप्रमाणें पूर्णपणें पाळलें असल्यामुळें येथें प्रकट होऊन मी तुला दर्शन देत आहें. सावित्री, तूं वणव्यांत मरायला तयार झालीस, वाघाला आपली मान दिलीस, आणि सर्पाचे विषाला भ्याली नाहींस; पतीसाठीं प्राणहि खर्ची घालणारी तूं पतिव्रता आहेस; तुझें शांतवन ह्या प्रसंगीं करणें मला भाग आहे. सावित्री, मनुष्याचे हातीं जन्म व मृत्यु नाहीं; परमेश्वराच्या हातची ही गोष्ट आहे. सत्यवानाचे प्राण मीं हरण केल्याबद्दल मला दोषहि देऊं नकोस आणि वृथा शोकहि

करूं नकोस. सावित्री, आतां आश्रमाकडे परत जा आणि मृतासंबंधाच्या धार्मिक कृत्यांना तुम्ही सर्व आतां लागा.

**सावि०:**—महाराज, जन्ममृत्यूसारख्या अपरिहार्य गोष्टीबद्दल हर्ष किंवा शोक मी करीत नाहीं.—आपण यमधर्म आहांत, सर्व विश्वाचें धारण-पोषण व्हावें ह्या धर्माकरितां आपण मृत्यूचें काम करीत आहां; असल्या सत्पुरुषाचें दर्शन घडणें म्हणजे मोठें भाग्य होय.—आपण मला उपदेश केला, इतकी सत्संगति मला लाभली! असल्या सत्संगतीच्या वेळीं मनाला शांति मिळावी अशी याचना केल्याशिवाय कोण राहील? सत्संगतीचा लाभ आणि मनाला शांति, ह्यांची सांगड असली पाहिजेना?

**यम०:**—सावित्री, तूं सुख किंवा दुःख जर ह्या प्रसंगीं करीत नाहींस, तर तुझें मन शांत कां नाहीं?

**सावि०:**—मनुष्याच्या हातची गोष्ट नव्हे म्हणून जन्ममृत्यूबद्दल सुखदुःख करूं नये, हें मनाला पटतें; पण ह्यांच्या प्राणाबरोबर माझे प्राण परलोक गांठायला तयार असतांना ह्यांना सोडून मी आश्रमाकडे परत जावें, हें मनाला पटत नाहीं; आणि त्यामुळें मनाला शांति नाहीं. आपण जर माझें मन शांत करूं शकला नाहीं तर आपल्या सारख्यांची सत्संगति मला लाभली, असें कसें म्हणावयाचें?

**यम०:**—माझें दर्शन तुला घडलें; मृत्यूच्या सत्संगतीचा फायदा तुला मिळाला पाहिजे. संगस्वरूपी कर्म आहे; सत्संग म्हणजेच सत्कर्म! सत्कर्माचें फळ म्हणून सावित्री, तुला एक वर देतों; सत्यवानाला जिवंत करण्याची बाब सोडून एक वर मागून घे सावित्री.

**सावि०:**—आईबापांची सेवा हें त्यांचें मुख्य व्रत; त्यांनीं जें मागितलें असतें तेंच मी आतां मागून घेतें. माझ्या श्वशुरांची गेलेली दृष्टि व गेलेलें राज्य परत मिळावें, आणि त्यांनीं चिरकाल ऐश्वर्य भोगावें, असें मी मागत आहें.

**यम०:**—सावित्री, तूं मागितलेंस तसेंच झालें म्हणून समज. मी आतां

सत्यवानाच्या प्राणांना बरोबर घेऊन मेघमंडळांत जातों आणि तुझा वर तुला मिळाल्यामुळें तूं आपलें मन शांत करून आश्रमांत सासुसासऱ्यांकडे परत जा.

[ यमधर्म मेघमंडळांत जातो; सावित्री पूर्वोक्त पद म्हणत तेथें जाते ]

**यम०:**—हें काय सावित्री, तूं परत गेली नाहींस !

**सावि०:**—मी कशी परत जाऊं ? माझ्या बुद्धीला संतोष नाहीं आणि माझ्या मनाला शांति नाहीं; कोणाबरोबर चार पावलें चालत गेलें असतां मैत्री होते; पृथ्वीवरून मेघमंडळापर्यंत मी आपल्या बरोबर आलें आहें; यमराजाची एक तऱ्हेची मैत्री संपादण्याइतकी माझी पुण्याई असतांना, ज्या प्राणांच्या सहवासांत नेहमीं रहावें असें माझ्या प्राणांना वाटतें, त्या माझ्या प्राणेश्वराला सोडून आश्रमाकडे परत जाण्यानें माझी बुद्धि कशी संतुष्ट होईल ? एक लोकांतून दुसऱ्या लोकांत जाण्याचा प्रवास आपल्या सारख्या सत्पुरुषाच्या कृपाछत्राखालीं केल्यावर माझें तापत्रय कां नष्ट होऊं नये ?

**यम०:**—सावित्री, तुझी बुद्धि संतुष्ट व्हावी म्हणून मी तुला आणखी एक वर देतो; सत्यवानाचे प्राणांना मागण्याशिवाय इतर पाहिजे तो एक वर मागून घे.

**सावि०:**—महाराज, माझ्या आईबापांना मी एकटीच मुलगी आहे; माझ्या आईबापांना पुत्रपौत्रांचें सुख भरपूर मिळावें, असा वर मी मागून घेत आहें.

**यम०:**—सावित्री, हाहि वर तुला दिला आहे—सावित्री, तूं आतां प्रसन्न चित्तानें आश्रमाकडे परत जा; सत्यवानाचे प्राणांना बरोबर घेऊन तारामंडळांत मी आतां जात आहे.

[ यमधर्म तारामंडळांत जातो; सावित्री पूर्वोक्त पद म्हणत तेथें जाते. ]

**यम०:**—हें काय सावित्री, तूं कां परत गेली नाहींस ?

**सावि०:**—आपल्या अनुग्रहामुळें ह्याहि लोकीं मीं संचार केला आहे.—हे प्राण ज्या ठिकाणीं त्या ठिकाणीं माझे प्राण, असा माझा दृढनिश्चय आहे;

आणि आपला अनुग्रहहि या निश्चयास अनुकूल आहे.—आम्ही दोघेजण सदाचारानें सद्धर्माचें पालन करून परमेशाची भक्ति अनन्यभावानें करीत असतांना आमची ताटातूट कां व्हावी, हें माझ्या जीवाला समजत नाहीं.— ह्या प्राणांबरोबर माझे प्राण सतत ठेवण्याशिवाय इतर कोणतीहि गोष्ट करण्याचें नाकारल्यानें मी परमेश्वराचीच सेवा करीत आहें; अशी सेवा करीत असतांना बळजोरीनें मला लाथाडून—आपल्या ह्या मुलीचा जीव एक तऱ्हेनें मारून—आपण मला परत लावलें पाहिजे; मी आपण होऊन परत जाणार नाहीं.—अपरिहार्याकरितां दुःख करूं नये; पण सत्कर्माचा उद्योगहि सोडूं नये.—तीन लोकांत आपलें दर्शन मला झाल्यामुळें आपण मला आईबापांच्या जागीं आहां.—मुलीच्या जीवाचा चेंदामेंदा आईबाप करूं इच्छितात काय?

**यम०:**—आपल्या मुलीच्या जीवाचा चेंदामेंदा कोणते आईबाप करूं शकतील? पुत्रपौत्राच्या सान्निध्यानें आपल्या मुलीच्या जीवाला आत्मानंद प्राप्त व्हावा, असेंच सावित्री, माझे आवडते मुली, तुझ्या ह्याहि आईबापांना वाटत आहे.

**सावि०:**—मग माझ्या पतीचे प्राण मला परत देऊन पुत्रपौत्रांचें सुख मला भरपूर मिळेल असा मला आशीर्वाद माझ्या आईबापांनीं द्यावा, अशी आपल्या मुलीची आपणांस प्रार्थना आहे.

**यम०:**—सावित्री, तुझा दृढनिश्चय व तुझी भक्ति पाहून हाहि वर मी तुला देत आहें.—सावित्री, तुला दोन तीन प्रकारच्या मृत्यूचें भय दाखविलें आणि सासरचीं व माहेरची समृद्धीहि तुझ्यापुढें ठेविली; पण दुःख किंवा सुख दोनहि अवस्थांना सारखें लेखून तूं आपलें पतिचरणावरील लक्ष इकडे तिकडे बिलकूल ढळूं दिलें नाहींस, सत्यवानाप्रमाणें तुझ्याहि अंगीं साधूचें शील पूर्णपणें बिंबलेलें आहे; तेव्हां तुम्ही दोघांनीं आपल्या धर्मानें संसार चालवून पुत्रपौत्रांचें सुख चिरकाल

ोगावें आणि सिद्धावस्थेंत लोकसंग्रहाचें परमेश्वरी कार्य तुमच्या हातून पार पडावें, असा अनुग्रह परमेश्वरानें तुम्हांवर केला आहे.—सावित्री, ह्या परमेश्वरी इच्छेला अनुसरून मीं सोडून दिलेले सत्यवानाचे प्राण आतां सत्यवानाचे शरीरांत प्रवेश करतील; सावित्री, तूं आतां पतिसन्निध मेध्यारण्यांत जाऊन पतीला सावध कर.—मुली, संपूर्ण सुखशांतीचें व अखिल ज्ञानाचें माहेरघर तूं होवोस, असा तुला अन्तर्धान पावतांना माझा आशीर्वाद आहे.

[ यमधर्म अन्तर्धान पावतो; सावित्री सत्यवानाजवळ पूर्वोक्त पद म्हणत येते. ]

**सत्य०:**—( जागा होऊन ) काय, प्रातःकाळ झाला! किती वेळ मी निजलों—मी असा निजलों कसा?—मला अगोदर जागे कां नाहीं केलेंस? बाबा काय म्हणतील, आई काय म्हणेल—

[ पडद्यांत—अग सावित्री, सावित्री, कोठें आहां तुम्ही? अश्वपति महाराज व मालवी महाराणी ह्यांच्या स्वाऱ्या ह्या येथें आल्या आहेत; कोठें आहां तुम्ही? ]

**सावि०:**—आम्ही आलोंच; चलायचें बाबांच्या दर्शनाला.

**सत्य०:**—ये अशी माझ्या मागून. [ जातो.

**सावि०:**—आई बाबा कसे वेळेवर आले! [ पूर्वोक्त पद म्हणत जाते.

[ पडदा.

---

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळ—मेध्यारण्य; गौतम मुनींचा आश्रम; अश्वपति, मालवी, सत्यवान, सावित्री, गायत्री, कल्याणी वगैरे प्रवेश करितात. ]

गौतम०:—अश्वपति महाराज, मालवी महाराणी, द्युमत्सेन महाराजांचें राज्य त्यांना मिळालें आहे, त्यांची दृष्टि त्यांना पुन्हां मिळाली आहे, आणि आईबापांची सेवा करण्याचा धर्म पाळणारा त्यांचा मुलगा सत्यवान मृत्यूच्या मुखांतून सुटून परत आला आहे; हें सर्व सावित्रीनें यमधर्मापासून मिळविलें आहे. ह्या मंगल समयीं आपली आणखी कोणती इच्छा आहे ?

अश्व०—ह्या प्रसंगीं परमेश्वरापाशीं हेंच मागणें आहे.

पद ३५, राग–हिंडोल; ताल–धमार, चाल–" साच तूं समधान. "

लोकसंग्रह–धर्म–कर्मा । प्रकटवो बहु साधु–महिमा ।। ध्रु० ।।
आसुरी मति फिरवावया, साधु वसवो शील–धामा ।। १ ।।

[ पडदा.

